


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# काव्यानंद

*काव्यानंदाची उत्पत्ति, कशांत आहे ? हें सिद्ध करण्यासाठीं म्मटापासून तों प्रा. रा. श्रीं. जोगांपर्यंत अनेक काव्यशास्त्रज्ञांनीं आपापल्या उपपत्त्या आग्रहपूर्वक मांडल्या आहेत,*



मात्र—

# दीपावली चा

दर महिन्याला प्रसिद्ध होणारा, वैशिष्टयपूर्ण आणि भरघोंस साहित्यानें परिपूर्ण असणारा अंक, म्हणजे प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या जीवनांत एक वेगळाच आनंद निर्माण करतो याबाबत सर्वांचेंच एकमत आहे.

कारण दीपावलीच्या प्रत्येक अंकांत आघाडीवरच्या कथाकारांच्या ललितरम्य कथा, विचारवंतांचे उद्बोधक लेख, भावस्पर्शी कविता—परमेश्वर आणि मी, भाषा मराठीच, रहस्यपूर्ण सत्यकथा, जुन्यातलें सोनें, पाणपोई, शरीरस्य कथा रम्या, भारतीय लोकनृत्यें, मूर्ति लहान पण कीर्ति थोर, दीपमाला, स्फूर्तीचो फुलें, शेवटचें पान हीं वैविध्यपूर्ण सदरें,
— दर अंकांत भारतीय संस्कृतीचें प्रतीकात्मक चित्र, शिवाय व्यंगचित्रें.

**आणि मुखपृष्ठावर दरवेळीं नवनवीन अनेकरंगी चित्र.**

**चार खास अंकांसह वार्षिक वर्गणी रु. १२–५०**



एजंटांनो दरमहा १० तारखेच्या आंत मागणी नोंदवावी अन्यथा हव्या तेवढ्या प्रति मिळणे शक्य होणार नाहीं

अधिक माहितीसाठीं :—

**दलाल आर्ट स्टुडियो**—४२ कॅनेडी ब्रिज, मुंबई ४.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



सा हि त्य
क ला
सं स्कृ ति

वर्ष १६ वें
जून १९६०

# दीपावली

## श्रेय नामावलि



दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल**. दलाल आर्ट स्टुडियो ४०-४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

या महिन्यांतील
मुजऱ्याचे
मानकरी

# आचार्य प्रल्हाद केशव अत्रे

मला वाटतं १९५४ साल असावं तें !

पुण्यांत विजयानंद थिएटरांत आचार्य अत्र्यांचा जाहीर सत्कार होता. 'शामची आई' हा चित्रपट विजयानंद थिएटरांत सतत पंचवीस आठवडे चालला म्हणून प्रकाशन संस्थेतर्फे अत्र्यांचा गुण-गौरव करण्यासाठीं एक खास समारंभ करण्यांत आला. या प्रसंगीं अत्र्यांचा एक परिचित म्हणून मला भाषण करण्याची विनंति करण्यांत आली. मी म्हटलं —

"—अत्र्यांचं सारं आयुष्य तुफानी आहे. ग्रीक पुराणांतल्या मिडास राजाप्रमाणें, त्यांनीं ज्या वस्तुला हात लावला त्याचं सोनं केलं. मुलांचीं पाठ्यपुस्तकें, काव्य, नाट्य, वृत्तपत्रव्यवसाय, चित्रपट—ज्या ज्या क्षेत्रांत गेले तेथें त्यांनीं अपूर्व आणि अद्‌भुत कामगिरी केली—"

शेवटीं सत्काराला उत्तर देतांना अत्रे उठले आणि म्हणाले—"आतां माझ्या तरुण मित्रानें मी ज्या ज्या वस्तुला हात लावला त्याचं सोनं केलं असं माझं वर्णन केलं. या वर्णनांत तथ्यांश किती आहे तो तुम्हीच पडताळून पहा – कदाचित् मी ज्या वस्तुला हात लावला तिचं सोनं झालं असेल—पण मित्रहो, या वेड्या सोन्यानें मात्र मला कधींच हात लावलेला नाहीं."

अत्र्यांच्या या वाक्यानें सारें थिएटर हास्यकल्लोळांत बुडून गेलें–आज तो प्रसंग ते प्रेक्षक विसरूनहि गेले असतील. पण विनोदाचा भास निर्माण करणारें तें कारण-वाक्य अजून माझ्या कानांत घुमतें आहे.



*एक झुंजार मराठा*

कारण अत्र्यांच्या जीवनाची सुखांतिका आणि शोकांतिका यांतच आहे. संयुक्त महाराष्ट्रप्राप्तीच्या आनंदांत सारा महाराष्ट्र मशगूल असतांना ज्यांच्या आवेशयुक्त, प्रखर, मर्मभेदी आणि अंतःकरणांचा ठाव घेणाऱ्या वाणीनें आणि उपहासप्रचुर पण अंतर्भेदी–ज्वलंत अशा लेखणीनें हें एकभाषी मराठी राज्याचें स्वप्न साकार करण्यांत आपला सिंहाचा वाटा उचलला, त्या अत्र्यांची सिंहगर्जना बहुजनसमाज चटकन् विसरून गेला.

मला वाटतं अत्रे हे जातिवंत कवि आहेत. राजकारणी माणसा-प्रमाणं ते प्रांतीय काय पण आंतरदेशीय प्रश्नाबाबतहि आपली जहाल आणि नि[illegible] त्यांच्यासमोर मांडत असतात. अशा प्रसंगीं माझ्या[illegible] राजकारणी नव्हत—तुमचं मन आणि धारणा [illegible] आहे—असं म्हटलं कीं आचार्यांना राग येतो.

आणि अत्रे रागावले कीं फार चांगलं बोलतात आणि फार चांगलं लिहितात. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यांत आणि गेल्या निवडणुकींत मराठा वर्तमानपत्र हें तर सर्व पक्षांतील कार्यकर्त्यांनीं बायबलसारखं मुखोद्गत् केलं. महाराष्ट्रांतल्या चावडी चावडीवर मराठ्याच्या अग्र-लेखाचें सामुदायिक वाचन झाल्याचें मला खात्रीलायक ठाऊक आहे. आणि त्यामुळेंच निवडणुकींत यशाचें माप समितीकडे झुकलें हें निर्विवाद. महाराष्ट्रांतील एका काँग्रेसवादी वृत्तपत्राच्या संपादकाची अत्रे खूप चेष्टा करायचे. त्याला यथेच्छ शिव्याशाप द्यायचे. त्यावर हा संपादक म्हणायचा– अत्रे शिव्याहि इतक्या छान देतात कीं त्याहि वाचाव्याशा वाटतात."

अत्र्यांचं लिखाण सोपं असतं. अवघड विषय सोपा आणि मिष्ठास भाषेंत वाचनीय करून सांगण्याची अत्र्यांच्या एवढी किमया मला वाटतं महाराष्ट्रांत दुसऱ्या कोणत्याच लेखकापाशीं नसेल. त्यामुळें अत्रे हा खरा तेलीतांबोळ्यांचा शिक्षक. त्यामुळं अत्र्यांचं व्याख्यान ऐकावं आणि मनमुराद हंसावं याचं महाराष्ट्राला व्यसनच जडलेलं आहे. अत्रे आणि गर्दी या दोन अभिन्न वस्तु आहेत. हजारों–( अत्र्यांच्या भाषेंत लाखों ) माणसं समोर बसली आहेत अशा प्रसंगीं आत्रेय वाणीची करामत काय वर्णावी ? तिला असा कांहीं बहर येतो कीं विचारूं नका. व्यासपीठावर रसराज विनोद आपल्या सर्व आयुधानिशीं आपल्यासमोर साक्षात् उभा आहे कीं काय असा भास व्हावा. मराठी माणसाला ऐकायची संवय नाहीं सांगायची संवय आहे. पण त्याच मराठीमाणसाचे कर्ण आत्रेय संकीर्तनासाठीं अष्टौप्रहर भुकेले असायचेच.

पण हजारों माणसांमुळें लुब्ध होणारा हा थोर साहित्यिक आपल्या चार समव्यवसायी मित्रांशीं बोलतांनाहि असा कांहीं रंगतो कीं त्याचं वर्णन काय करावं. काव्यशास्त्रविनोदाची ती महापर्वणीच जणूं. जुन्या गोष्टी रंगवून रंगवून सांगाव्यात अत्र्यांनींच. आणि सांगतां सांगतां आपणहि त्यांतील विनोदावर वेहद्द खूष होऊन हंसावें अत्र्यांनींच.

अत्रे नेहमीं दोन टोकं गांठतात. एक अत्युत्कृष्ट आणि दुसरं भिकार—अति भिकार. एखादी गोष्ट त्यांना आवडली कीं त्यासारखी उत्कृष्ट वस्तु जगांत नाहीं असं त्यांचं प्रामाणिक मत होतं. आणि एखादी वस्तु नावडली कीं त्याच्यासारखी भिकार गोष्ट जगांत नाहीं असं ते अट्टाहासानें सांगतात. अत्र्यांची हीं दोन टोकं म्हणजे त्यांच्या

[ पान ५८ वर चालू ]

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

श्रीमद् आद्यशंकराचार्य

ब्रह्मयाहूनहि वेद जाणिति अती, वेदांग गार्ग्याहुनी,
तात्पर्यार्थविवेचनीं जणुं गुरु, तत्कर्मसंवर्तनीं--
जे का जैमिनिमूर्त, बोधनिंहि जे व्यासांहुनी जाणते
माझे सद्गुरु पूज्य नित्य मजला श्रीशंकराचार्य ते !

अनुवाद— **शान्ता ज. शेळके**





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका





ज्येष्ठ शके १८८२ जून १९६०

# जगद्गुरु श्रीमद् आद्यशंकराचार्य

धर्मपुनरुज्जीवनाचें निशाण प्रथम उभारणाऱ्या शंकराचार्यांनां आधुनिक नवयुगाचे आद्य आचार्य म्हणून सर्व भरतखंडांत मान दिला जातो. आतांपर्यंत शंकराचार्यांची अनेक चरित्रें उपलब्ध आहेत, पण ती भक्तांनीं लिहिलेलीं महात्म्यें आहेत. आणि ऐकिव दंतकथांवर आधारलेलीं असल्यामुळें तीं बाष्कळ आणि निराधार वाटतात असें संशोधकांचे म्हणणें आहे. तसेंच कालाच्या बाबतींत. शंकराचार्यांचा काल कोणता हाही एक वादग्रस्त प्रश्न आहे.

पांचव्या वर्षी उपनयन, आठव्यावर्षी पूर्ण वेदाध्ययन, बाराव्यांत शास्त्राध्ययन, सोळाव्या वर्षी शारीरभाष्य रचना, व बत्तिसाव्या वर्षी निर्याण. असे हे त्यांच्या चरित्रांतील मुख्य टप्पे.

आचार्यांचे पितामह विद्याधिराज हे मलबारांतील 'कालटी' या गांवचे इनामदार होते. नंबुद्रीकुलांतला हा ब्राह्मण महा विद्वान होता. त्यांचा मुलगा शिवगुरु. शिवगुरुंचे लग्न होऊन बरींच वर्षे लोटली, तरी त्यांना पुत्रसंतान नव्हतें. अखेर संतानप्राप्तिकरितां शिवगुरू आणि त्यांची पत्नीं आर्याम्बा या उभयतांनीं कडकडीत तपश्चर्या केली. आणि त्यांच्या त्या उग्र तपश्चर्येला श्रीशंकर प्रसन्न होऊन त्यांना पुत्रलाभ झाला.

पुत्रलाभ झाला खरा; परंतु त्यानें केलेल्या दिग्विजयाचें सुख पाहाण्याचें कांहीं शिवगुरुंच्या नशीबीं नव्हतें. एकाएकीं त्यानीं इहलोक सोडला. आचार्यांच्या मनांत बालपणांतच वैराग्याची भावना उत्पन्न व्हायला हेंहि एक कारण असावें. बालपणींच पितृवियोग झाल्यानें आणि पांचव्या वर्षी मौजिबंधन झाल्यावर, वेदाध्ययन तर आचार्यांनीं त्यांच्या आठव्या वर्षीच पूर्ण केलें होतें; परंतु एकदां आलेली संसारविरक्तता आचार्यांच्या मनावर विलक्षण परिणाम करती झाली. त्यामुळें गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम वगैरे झाल्यानंतर घेण्यांत येणारी संन्यास आचार्यांनीं ब्रह्मचर्यावस्थेंतच घेतली. असा संन्यास घेणें हें वास्तविक बौद्धांचें अनुकरण होय. आणि शिवाय वैदिक धर्म तें गौणच मानतें; परंतु त्यावेळीं या संन्यास दीक्षेबद्दल उठलेल्या वादंगाला शंकराचार्यांनीं जाबालश्रुतींचा आधार देऊन आपल्या बालसंन्यासाचें समर्थन केलें.

शंकराचार्यांचे आश्रमगुरु गोविंदयति. ओंकारमांधाता क्षेत्रांत त्यांनीं आश्रम घेतला. आठवे वर्षी संन्यास दीक्षा घ्यायला आईकडून परवानगी मिळेना. एके दिवशीं माय-लेक पूर्णा नदीवर आंघोळीला गेले असतां श्री शंकराचार्यांचा पाय एका मगरीनें धरला. आर्याम्बा मातोश्रींच्या हें लक्षांत येतांच त्यांनीं आकांत केला; परंतु आचार्यांनी शांतपणानें सांगितलें, कीं "जर तूं मला संन्यास दीक्षेची परवानगी देशील तर मगर माझा पाय सोडील!" तशी परवानगी आर्याम्बानीं दिली, तेव्हां कुठें मगरीनें पाय सोडला अशीहि एक कथा आहे.

शंकराचार्यांचा शास्त्राभ्यास बदरिकाश्रमांत, भाष्यरचना वाराणशींत त्यानंतर दिग्विजय आणि अखेरीस श्रृंगेरी येथें कायम वास्तव्य असें एकंदर जीवनचरित्र आहे. आचार्यांचें निर्याण स्थान हें कांजीवरम् कीं हिमालयांतील बदरीकाश्रम याविषयींहि वाद आहे.

शंकराचार्यांनीं सर्व श्रुतिस्मृतींचा समन्वय करून उपनिषदांच्या भक्कम पायावर सनातन धर्माची इमारत उभारली. सर्व धर्माचें मूळ 'आत्मज्ञान' असून "अहंब्रह्मास्मि" अशा आत्मसाक्षात्कारी मताचे अद्वैत वर्चस्व प्रस्थापित केल्यानंतर बुद्धांचा "नास्तिपक्ष" जैनांचा "स्याद्वाद" मिमांसकांचें "अपूर्व" या सर्व कल्पना व वाद, पोरकट आणि निराधार आहेत हें सिद्ध केलें.

जैन व बौद्ध पंडितांचें त्यावेळीं जिकडे तिकडे वर्चस्व होतें.

सारा भरतखंड बौद्धांचा जैनांचा चाहता झाला होता; किंबहुना तिबेट-चीननेंहि त्याचा अंगिकार केला होता.

त्याकाळीं विद्वानाला आपल्या मत-प्रस्थापनेसाठीं प्रतिस्पर्ध्यांना वादांत जिंकावें लागे. गांवच्या वेशीजवळ नगारा ठेवलेला असे.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तो वाजवून त्यानें सर्वांना आव्हान करायचें, व मग राजदरबारांत प्रसिद्धपणें वाद होऊन जो विजयी होईल त्याला अजिंक्यपत्र तसेंच जहागीरहि मिळे. आचार्यांच्या दिग्विजयांत त्यांना ठिकठिकाणच्या राजेलोकांची मदत झाली.

अशाच एका वादांत मंडणमिश्रांचा पराजय करून त्यांना आपलं शिष्य केलं. 'शारीरभाष्य' तयार केल्यानंतर श्रृंगेरी मठांत आचार्यांनीं बारा वर्षे विश्रांति घेतली. त्या अवधींत त्यांनी उपनिषद्भाष्य, गीताभाष्य, प्रकीर्ण, प्रपंचसार, विष्णुसहस्रनाम-भाष्य, सनत्सुजातीयभाष्य, विवेकचूडामणि, अपरोक्षानुभूति, अद्वैतानुभूति इत्यादि ग्रंथांची रचना केली.

आचार्यांचे मुख्य शिष्य चार. मंडनमिश्र उर्फ सुरेश्वराचार्य, पद्मपादाचार्य, हस्तमलकाचार्य व तोटकाचार्य.

गौतमबुद्धानीं वैदिक धर्माचा उच्छेद करण्याचा प्रयत्न केला असतांहि त्याला परमेश्वराचा दहावा अवतार मानून त्यांच्या सांप्रदायाशीं आपला कुठल्याहि तऱ्हेचा विरोध न दर्शवतां ज्या अक्षय्य वटाखालीं गौतम बोधिसत्व झाला त्या वटालाहि पूज्य मानून, जैन बौध आदि वेदबाह्य मतांतील चांगला अंश ग्रहण करून श्री शंकराचार्यांनीं वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें म्हणूनच त्याना "प्रच्छन्न बुद्ध" असेहि म्हणतात !

पश्चिमेला द्वारका, पूर्वेला जगन्नाथपुरी, दक्षिणेला श्रृंगेरी व उत्तरेला बद्रीनारायण अशी चारी दिशांना जगद्गुरुमठांची स्थापना केली.

आद्य शंकराचार्य म्हणून रविवर्म्यानें जें चित्र काढलेलें आहे व ज्याचें घरोघर शंकराचार्य म्हणून पूजन होतें तें चित्र वस्तुतः शंकराचार्यांचें नसून विद्यातीर्थ उर्फ विद्याशंकर यांचें आहे असा संशोधकांचा दावा आहे. वास्तविक शंकराचार्यांच्या मठांत संग्रहीत केलेल्या ग्रंथांत अस्सल अशी सर्व माहिती मिळालीहि असती; परंतु पेशव्यांच्या सरदारांनीं या मठांचा सर्वतोपरी विध्वंस केला. हरिपंत फडक्यांच्या सैन्यानें द्वारकामठ लुटला. पटवर्धनांनीं करवीरमठ जाळून टाकला. ज्या श्रृंगेरी मठाला टिपुसुलतानानें देखील देणग्या, जहागिऱ्या दिल्या त्या मठाचें सर्वस्व हरण पटवर्धन सरदारांनी केलें. हा इतिहास सुप्रसिद्ध इतिहासकार वासुदेवशास्त्री खरे यांनी संशोधून प्रसिद्ध केलेला आहे. मठ लुटल्यामुळें व तेथील देव–देवतार्चनाचा विध्वंस झाल्यामुळें मठाचे स्वामी उपोषण करूं लागले. या पापामुळें राज्यावर संकट येईल अशी भीति नानाफडणविसांना उत्पन्न झाली. मठांची नुकसान भरपाई करून देण्याबद्दल त्यांनी पटवर्धनास पुष्कळ आग्रह केला; परंतु पटवर्धनांनी तें ऐकलें नाहीं. मठांची आणि तेथील धनदौलतीची नासाडी झाली एवढीच गोष्ट झाली असती तर तें वेगळें होतें; पण तेथील अस्सल असे कागद-पत्र नाहींसे झाल्यानें मात्र खरा इतिहास दुर्लभ झाला.

यापुढें पृथ्वीवर अनंत परिवर्तनें होतील. आचार विचार सर्व कांहीं बदलून जाईल; परंतु "अहं ब्रह्मास्मि" या श्रीमद्शंकराचार्यांच्या तत्त्वाचा अंमल मात्र जगाच्या अंतापर्यंत भारतवासियांच्या अंतःकरणांतून नाहींसा होणार नाहीं.

* * *

## 'सबमीट' कॉन्फरन्स



प्रचंड जाहिरात केलेली शिखर परिषद अखेर झालीच नाहीं

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका





# शृं गा र

— राजा बढे

## श्री रं ग

[ महाराष्ट्राचे शृंगार शाहीर श्री. राजा बढे यांच्या रससत्या लेखणींतून उतरलेला जयदेव कवीच्या गीतगोविंद या ख्यातनाम काव्याचा रसपरिपूर्ण अनुवाद दीपावलींतून क्रमशः प्रसिद्ध होत आहे. त्यांतील पहिला हप्ता. ]

### सर्ग पहिला

( सामोद-दामोदरं )

मेघांनीं हे भरलें अंबर तरुतमाल घनशामल छाया
' जा घेउनियां खेळायातें राधे अवखळ बाळ कन्हैय्या '
नंदवचन ऐकुनियां आतुर राधा-माधव जाया निघती
यमुनापुलिनीं, कुंजवनीं रतिलीला लालस क्रीडा करिती

छेडित वीणा हृदय शारदा
मनोमयी मधु गीत संपदा
वासुदेव रतिकेलि कलाही
श्री जयदेव कवी नित गाई
वांछिसि अपुलें मन रमवाया
हरिस्मरणाचें अमृत प्याया
कोमलकांत पदावलि मधुरा
ऐका रसिका जयदेव गिरा

**( प्रबंध १ ला )**

( राग—मालव. ताल—रूपक )

प्रलयकालिं तारिलेस वेदां, मुनिजनमानस वारित खेदां
केशव मीन शरीर धरी, जय जगदीश हरी ॥ १ ॥
पाठीवर वाहिलीस पाही, वाचविली तूं वसुंधराही
केशव कासवरूप धरी, जय जगदीश हरी ॥ २ ॥
कलंक शोभे चन्द्रकलेवरि—धरा धरी ती दंताग्रावरि
केशव वराह रूप धरी, जय जगदीश हरी ॥ ३ ॥
करकमलावरि नखशृंगें ती, असुरभृंग कश्यपू विदारिति
केशव नरहरि रूप धरी, जय जगदीश हरी ॥ ४ ॥
छळि बळिराजा तो बटु वामन करि पदनीरजलें मन पावन
अद्‌भुत वामन रूप धरी, यज जगदीश हरी ॥ ५ ॥
क्षात्रकुलें संहारित निकरें, भृगुपति भिजवित भूमी रुधिरें
केशवभार्गव रूप धरी, जय जगदीश हरी ॥ ६ ॥
इंद्रजीत वधिला, दशकंधर, थरकांपे·भिउनी धरणीधर
केशव रघुपति रूप धरी, जय जगदीश हरी ॥ ७ ॥
हलधर भयभीता कालिंदी, येई वाहत पदारविंदी
नीलवसन वेढिलें हलधरें जय जगदीश हरे ॥ ८ ॥
निंदित यज्ञबली पशुघाता, सदय हृदय हे अनाथ नाथा
केशव बुद्धशरीर धरी, जय जगदीश हरी ॥ ९ ॥
म्लेंच्छ हनन करि खड्ग धरी, धूमकेतु कीं कराल निकरीं
केशव कल्कि स्वरूप धरी, जय जगदीश हरी ॥ १० ॥
श्री जयदेव रचित मधु छंदा गाइन मी नित हृदयानंदा
केशव दशविध रूप धरी, जय जगदीश हरी ॥ ११ ॥

**( प्रबंध २ रा )**

[ राग–गुर्जरी. ताल–प्रतिमंठ ]

कमलाश्रित कुचमंडळ, श्रुतिकुंडल हे
कंठिं रुळत वनमाळ— जय जयदेव हरे
रविकुलमंडळ मंडन, भवखंडन हे
मुनिजन मानस हंस— जय जयदेव हरे
कलियमथन, हे जनसुखवर्धन
यदुकुलनलिन दिनेश— जय जयदेव हरे
मधुमुरअसुरविनाशन, गरुडासन हे
सुरकुलकेलि निधान — जय जयदेव हरे






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कमलदलापरि लोचन भवमोचन हे
त्रिभुवनिं भरुनी उरलें— जय जयदेव हरे
शामजलदतनु सुंदर धरिकंधरि मंदर हे
श्रीमुखचंद्रचकोर— जय जयदेव हरे
तव चरणीं शरणागत सुखसंचित हे
प्रणतजना प्रतिपाळी— जय जयदेव हरे
श्री•जयदेवरचित रसरंजित
मंगल उज्ज्वल गीतें— जय जयदेव हरे

\+ + + +

हरिल गे शाम मनाची व्यथा
कमला कुच केशर चिन्हांनीं चित्रांकित उर लक्षीं
रतिश्रमजलबिंदुंनी गुंफिलें जाल कुतुहलें वक्षीं
सुखविल हृदया हरिची कथा.

× × × ×

वासंतिक दुर्गम कासारीं
वसंत कुसुमापरि सुकुमारी
मदनभरें विव्हल अनवाणी
फिरे राधिका वेड्यावाणीं
शोधित शामसखा वनकुंजीं
मंजुवचें सखि घालित रुंजी

## ( प्रबंध तिसरा )

( राग–वसंत – ताल-रूपक )

विहरति हरिसह सरस वसंतीं
विरह हरित हरि हसति विरहिता
सुखवित शामल कांती ॥ ध्रु ॥
डुलवित ललित लवंगलतांना मलयसमीर विहारी
गुंजित भृङ्ग, विहंगम कोकिल मंजुल कुंजविहारी
प्रीतीभरें मदयंती
मदनोन्मादित दूरदयित वधुवृंद विलापी पोळे
नील नि लोलुप अलिकुल कलिका बकुल फुलांतरि लोळे
रसिका गंधित भ्रांति
नवदळ माल तमाल सुपरिमल हरित हरिणिमद गंधा
रक्तपळस सुमसायक धाय करी युवहृदय निरबंदा
तळमळती एकांती
मदनराज भवकनकदंड नव केसर कुसुम विकासें
शर मधुकर दलमीलित सुमदल शरधिस्कंधि विलासे
जिंकित हृदयप्रांती
माधविका मधुमालति जाति सुगंधित कुंद चमेली
मुनिमानस मोहित हा युवसख वसंत सारस केली
उधळित रंग दिगंती
मुक्त विहारि लता तुज कवळी मोहरसी सहकारा
वृंदावनिं गोविंद येइ गे यमुना पुलिन विहारा
ऐक मधुर रसवंती
मदनसखा मलयपवन मंदमंद वाही
ने लुटुनी कुसुमगंध धुंददिशा दाही
जाइ-जुई सुम पराग
मनिं अनंग लावि आग

केतकिचा मधुरगंध मदनबंधु होई
विंधित विरही हृदया प्राण विकल होई
कवळि चन्दना भुजंग गरळ करित काहली
क्लेश क्लांत मलयवात जातसे हिमाचलीं
मोहरली वनमाया आम्रमंजिरी डुले
करिति ' कुहूं ' कोकिलकुल काननीं निनादले
भृङ्ग लोभले सहकाराच्या मुग्धमंजिरीवरी
कोकिल कूजन येतां कानीं विकल होति अंतरीं
वसंत समयीं येई आठव दिवस सरे विरहाचा
मनोमनीं ये घडुनी संगम पथिका प्रियरमणींचा
विलासिनी या रमणी अनेका
आलिंगिता लालस भावलेखा
श्रीकृष्ण तो दाखविते दुरोनी
राधेस सांगे सखि गूज कानीं

## ( प्रबंध चवथा )

( राग—रामकली : ताल—रूपक )

हरि हा मुग्ध वधूसह गे
करितो विलासवनिं सुभगे
शामतनूवरि चंदन उटि ती पीतवसन वनमाली
कुंडलमणि गालावरि रुळती हसतो माधव गालीं
पीन पयोधर भारवती कुणि आलिंगी श्रीहरिला
ऐक ऐक राधिके रागिणी सुस्वर पंचम धरिला
पापणिचे मृदुपंख थरकती, भृङ्गनयन ते काळे
वदनसरोजा भुलले, मदना जागविती वेल्हाळे
चुंबि कपोला कुणी येउनी गुपित सांगतां कानीं
रोमांचित हो नीलतनू ती मधुराधर चाखोनी
केलि कला रति चतुरा दुसरी ओढित धरूनी शेला
यमुनापुलिनी हळूच न्याया एकांतीं अलबेला
करतालावर किणति कंकणें वाजवि मंजुळ वेणू
रासरचित नाचती अंगना थरकत गति स्वर रेणूं
आलिंगुनि गौरांगी वामा चुंबुनि रमवी रामा
हासत डोळे मोडित पाही, तिसरी ती अभिरामा
श्री जयदेव कवीकृत अद्भुत केशव केलि कला ही
वृंदाविपिनीं, यमुनापुलिनीं रास रचुनि मन मोही

* * * *

जें आलें अनुरंजना प्रियजना सानंद इंदीवर
लीलालालित शाम कामललिता गोपांगना सुंदर
आलिंगी रसरंग हो मधुवनीं शृंगार श्रीरंग हा
खेळे रासविलास नीलकमलीं कामोत्सवीं भृंग हा
झाली पाहुनिया विलासवनिता उत्कंठिता राधिका
आली धावत देहभान सुटुनी घाली मिठी माधवा
' ओठीं अमृत सांडले हरि तुझ्या–होईन मी बांसरी
चुंबी प्रेमभरें सखी स्मितमुखी ती पाहुनी चातुरी
– सामोद दामोदर प्रथमसर्ग समाप्त –

• • •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# कवडसे

घरांत फलशोभनाची गडबड चालू होती. मधुराणीचं आधींच लोळागोळा झालेलं शरीर थरारून उठलं. आपण आतां मुग्ध नाहीं, लहान नाहीं. आपण बहकलों, प्रौढ झालों असंच तिला वाटूं लागलं...

अरविंद गोखले

## १

वादळांतल्या कळीसारखी मधुराणीची अनुकंपनीय अवस्था झाली होती.

वादळांतल्या कळीची कल्पना मधुराणीचीच. त्या भयानक उत्पातानंतर ओक्साबोक्शी रडतांना व नंतर कुठें तरी शून्य पहात असतांना तिला वादळांत ओरबाडून निघालेल्या कळीची आठवण आली. वादळांतली कळी, वादळांतली केळ, वादळांतली पणतीची ज्योत...किती तरी उपमांच्या भोंवती वेटोळे घेणारं मन अखेर कळीच्या चित्रापाशी स्थिरावलं. आपलं नाजुक शरीर नि निष्पाप मन एखाद्या सुकुमार कळीसारखं कुस्करलं गेलं ह्या जाणीवेनें ती परत अश्रुमोचन करूं लागली. कादंबऱ्यांच्या नि कल्पनेच्या विश्वांत वावरणारी ती अर्धमुग्ध मुलगी आलेल्या प्रसंगानें अगदी हीनदीन झाली.

महाजनांचा प्रचंड प्रासाद अजून गजबजलेला होता. गराजमधून युटिलीटी व्हॅन व दोन्ही मोटर गाड्या बाहेर निघाल्या होत्या. पोर्चमधून बाहेर आंत खेपा करीत होत्या. दर्शनी बागेवरची रोशनी सकाळ झाल्यानें विझवली होती, पण सडा रांगोळीनें फुलबाग, लॉन-सगळंच शोभिवंत झालं होतं. रेशीम, जॉर्जेट, सॅटीन, कार्डुराय, नायलॉन...सुगंध, सेंटस्, लिपस्टीक, नखरंग...अंगठ्या, लॉकेटस्, लफ्फा, चंद्रहार, बिन्दी, ..आईस्क्रीम, सरबतं, पेढेबर्फी, मिठाई... सिगरेटची वलंय, गंजिफा, गप्पा, हंसणी गाणी बजावणी... सुंदर, धनाढ्य नि रसिक स्त्रीपुरुषांनीं दोन दिवस आनंदोत्सव चालवला होता. महाजनांच्या सुनेचं फलशोभन महाजनांच्या ऐश्वर्याला साजेशा वैभवानं पार पडत होतं.

मधुराणी महाजनला समारंभांची आवड नव्हती. माणसांची वर्दळहि तिला मानवत नसे. पंधरा वर्षांची ती पोर नेहमी गंभीरपणें बोले वागे. चाळीस खोल्यांच्या त्या अवाढव्य प्रासादांत ती एका



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कोपऱ्यातल्या खोलीत सारावेळ पुस्तकं वाचीत बसे. पुस्तकं जवळ नसत, तेव्हां खिडकीच्या नाजूक नक्षीतून घरामागच्या टेकडीकडे टक लावून बसे. टेकडीच्या उतारावर दिसणाऱ्या अनोख्या वेली, गूढ सावल्या, एकाकी पाऊलवाटा, बागडणारी कोकरं पाहून तिची छोटी छाती उचंबळून येई. तिचं निरागस मन हलकं हलकं होई. कुणी न स्पर्शलेल्या स्वप्नासारख्या विश्वांत ती वितळून जाई.

पण लक्षाधीशाच्या घरी असावीं तशी महाजनांच्याकडे सदा आश्रित, पाहुणे, पार्ट्या, समारंभ, सफरी ह्यांची लूट चालू असे. आईवडील व दोन्ही भाऊ त्यांत रंगून जात. पण मधुराणी एवढ्या समारंभात एका बाजूला असे. सगळा भडकपणा वाटे तिला. पाहुण्याशीं बोलणं तर अगदी आवडत नसे. कुणीतरी आपल्या स्वप्नील जगांत डोकावेल, आपलं कोवळं अंग नि मन स्पर्शील, असं भय वाटे.

केवळ काव्य, आयुष्याबद्दल धूसर पण पवित्र कल्पना. स्वतःच्या उच्च भावना, स्वतःचं नाजूक शरीर—यांच्याबद्दल कडवा अभिमान, जगण्याची, स्नेह जोडण्याची वेगळी आखणी. त्यामुळें तिला दादाच्या लग्नाचा पसारा अजिबात रुचला नाही. वहिनि येणार हा एक आनंद होता—पण ती गर्दी, तें उपरे लोक—अन्, अन्, आतां तो विधी!

करवली होती म्हणून मधुराणीला मिरवणं भाग होतं. नकळत ती सगळा समारंभ आसासून पहात होती; व प्रयत्नपूर्वक घाईगर्दी नि नवख्यांच्या ओळखी टाळीत होती. नवरीचं लाजणं, खालीं पहाणं, अश्रु पुसणं—अन् मग नांव घेतांच चेहरा फुलून येणं, होम होतांच नवऱ्याशीं बोलूं पहाणं, मखरांत बसतांच—कवितेच्या जगांत वाहलेलं मधुराणीचं मन ह्या शरीरसंबंधांच्या सोहळ्यांत कासावीस झालं. आठवडाभर विवाहविधी, सर्वस्वाचं दान, एकत्र गुंफलं जाणारं आयुष्य, जन्मोजन्मींची सोबत, शरीराचं पावित्र्य—अनेक प्रश्नांच्या गुंतावळ्यांत ती घोळून निघाली.

आणि मग तो प्रसंग घडला. महाजनसाहेबांच्या सांगण्यावरून पोपटनें बागेतला लाऊडस्पीकर काढून घेतला व वायर गुंडाळून घरांत आणला. चवथ्या मजल्यावरच्या छोट्या खोलीत स्पीकर ठेवायचा होता. पोपटला ती जागा माहीत नव्हती. महाजनीण बाईसाहेबांच्या नात्यातला तो माणूस लग्नासाठीं म्हणून प्रथमच ह्या घरांत राहायला आलेला होता. आल्यापासून लहानसहान कामं आपणहून करीत होता. छानछोकी वागणं व आर्जवी बोलणं त्यामुळें पोपट सर्वांना आवडूं लागला. महाजनसाहेब सगळी कामं त्यालाच सांगूं लागले. आतांही म्हणाले, "चवथ्या मजल्यावरच्या कोठीत ठेव तो स्पीकर...जा ग मधुराणी. दाखव खोली पोपटरावांना—"

तिन्हीसांजा होत होत्या म्हणून जिन्यातले व खोल्यातले एकेक दिवे लावीत मधुराणी वर गेली. पोपट दोन्ही हातांत स्पीकरचा गोल व वायरचं वेटोळं धरून मागोमाग गेला. चवथ्या मजल्यावरच्या छोट्या खोलींत दोघं आली. पोपटनें हातातलं सामान ठेवलं. मधुराणीनें दिवा घालवला. अन् मग कांहीं कळायच्या आंतच पोपटनें तिला कवटाळलं व मनसोक्त, मोठं चुंबन घेतलं!

तो विद्रूप स्पर्श व भयानक आठवण कुरवाळीत मधुराणी खूप रडली व मग कोरड्या डोळ्यांनी कोपऱ्यांत बसली. झाल्या बेअब्रूचा तिनें बभ्रा केला नाहीं. कुणाजवळ ती बोलली नाहीं. सांगावं असं कोण होतं घरांत? जो तो नव्या नवरीची विचित्र थट्टा करण्यांत गुंगला होता. मधुराणीला सगळेच साधी, अल्लड समजत होते. आपण आरडा केला तर घरांत खळबळ होईल खरी—पण आपल्या अब्रूचं काचपात्र तडकलं, आपलं जीवित विटाळलं, असं कुणाला वाटेल अशी तिला खात्री वाटेना. पोपटला मारतील, पोलीसच्या ताब्यांत देतील व आपलं सांत्वन करतील. पण त्यापलीकडे...

पोपटनें कांहींच घडले नाही असं वर्तन केलं; अन् मग तो कांहीं सबब सांगून आपल्या बिऱ्हाडीं निघून गेला. मधुराणी आपल्या खोलींत एकटी बसून राहिली. रडत, हृदयातली धडधड ऐकत. काय घडलं, काय घडणार ह्याचा विचार करीत...

खूप रडली, खूप जागली, पुस्तकाच्या शेल्फवरुन टेकडीवरच्या वेलीकडे दृष्टि फिरवीत राहिली तेव्हां तिला उमगलं कीं आपलं शील हरपलं, आपलं सर्वस्व गेलं. सगळं दुसऱ्याचं, पोपटचं झालं. बादळातल्या कळीच्या उपमेशीं बोटाळणारं तिचं हृदय वजावूं लागलं कीं ती नुसती कळी नाही. वाहिलेलं फूल आहे. पुरुषाच्या पायावर वाहिलेलं फूल, पोपटच्या पायावर!

वाचलेल्या पुस्तकांची पानं फडफडूं लागली. स्वतःच्या अनाघ्रात शरीराचं एकांतांत केलेलं कौतुक स्मरलं. समर्पणाच्या कल्पनेची केलेली पूजा दिसूं लागली. होय! कसं कां होईना, तिचं पावित्र्य, कौमार्य संपलं होतं. पुरुषाची सावली व श्वास तिचं आयुष्य सारवून गेला. तिला आवडो, न आवडो, पोपट तिच्या स्वप्नांत तिच्या ओठांत डोकावला. ती त्याची झाली!

घरांत गर्भादानाचीं गडबड चालूच होती. दादा उगाचच सगळीकडे मिरवीत होता. शंभरजणींतून त्यानें ही मुलगी पसंत केली. प्रथम त्याला फोटो आवडला, मग मुलगी पहातांच पसंत पडली. नुसतं दर्शन—अन् मग ती मुलगी महाजनांच्या घरीं आली. दादाचा होकार परवां मिळाला—आणि आज ही शरीरसमर्पण करायला सिद्ध झाली.

मधुराणीचं आधींच लोळागोळा झालेलं हृदय थरारून उठलं. दादाच्या जागीं तिला पोपट दिसूं लागला. दादा मिरवीत होता अन् पोपट केव्हांच गावाच्या टोकाला असलेल्या आपल्या खोलीवर निघून गेला होता. वहिनी मखरांत बसली होती; नि इकडे मधुराणी अंधेरांत तडफडत होती. मधुराणीच्या अर्ध्याकच्च्या भावना तरारून गेल्या.

आपण आतां मुग्ध नाहीं, लहान नाहीं. आपण बदललो प्रौढ झालो...मधुराणी स्वतःला शिकवूं लागली. गंभीरपणें तिनें पदर लपेटून घेतला व खोली सोडून ती घरांतल्या गडबडीत मिसळून गेली. कामं करूं लागली, एखाद्या पुरंध्रीसारखं बोलूं बसूं लागली.

जरा वेळच—मग तिला वाटलं, हे घर आपलं नाहीं. शरीर जसं स्वतःचं उरलं नाहीं, तसं घरहि आपलं राहिलं नाहीं. आपलं घर वेगळं, जग वेगळं, मुक्ति दुसऱ्याच जागी!

मखरांत बसलेली वहिनी व तिच्या भोवतालची गडबड मधु-







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

राणीच्या मनांत गोंधळ माजवूं लागली. कातरवेळ झाली आणि ती अगदींच अस्वस्थ झाली. दूर, कुठें तरी दूर जावं, असं तिचं मन घोकूं लागलं.

—एकाएकी तिचं मन निवलं ! तिला मार्ग दिसला. टेकडीवरची वाट ?–छे. ते जग वितळलं होतं. त्या देखाव्यानेच तिला हा मार्ग सांगितला होता. मधुराणी दृढपणें उठली. हलक्या पावलानें घराबाहेर आली.

महाजनांच्या प्रासादाशीं वाजंत्री वाजत होती. बगिच्यांत रोषणाई केली होती. फलशोभनाचा समारंभ उतू चालला होता.

मधुराणी सरळ नजरेनें निघाली व कौलनी ओलांडून, बाजार मार्गे टाकून, गांवाच्या टोकाला आली. प्रयासानें तिनें पोपटची खोली शोधून काढली. कॉटवर आळसावून पोपट एकटाच सिगरेट ओढीत होता. मधुराणी महाजनच्या काव्यकच्च्या अर्धस्वप्नील जगावर पौरुषाचा ठसा उमटवणारा मनुष्य !

खोलीत चाचपडत पाऊल टाकीत खालच्या मानेनें मधुराणी म्हणाली, "मी आल्ये आहे—"

● ● ●



शेवंताला तिच्या नवऱ्यापासून सोडवली पाहिजे...वेगळी काढली पाहिजे...

आम्ही एकमतानें ह्या निर्णयाला आलो होतो. शेवंता नि हरीशचं बिऱ्हाड आमच्या वाड्यासमोरच होतं. रोजच त्यांच्या संसारांतले प्रकार दृष्टीस पडत होते. कधी हरीशचं ओरडणं तर कधीं शेवंताचं आमच्याकडे येऊन रडणं. त्यावर मग आमच्यांत चर्चा चाले. मार्ग शोधले जात. हरीशला ताळ्यावर कसं आणावं, शेवंताचे भोग कसे थांबवावेत, सरळ, साध्या वाटणाऱ्या ह्यांच्या संसाराला लागलेली वाळवी कशी थांबवावी...हरीश वेळूट वागत होता, शेवंता दीनवाणी झाली होती, अन् आम्ही उपाय शोधीत होतो.


"ए" पिल्स

रात्रीं लहान मुलांना नकळत लघवी होते त्याकरितां. शारिरीक व मानसिक अपाय नाहीं. रोज सकाळीं, दुपारीं व रात्रौ दोन दोन गोळ्या पाण्याबरोबर घ्याव्या.

१०० गोळ्यां किं. ३ रुपये

बहिरेपणावर कानांत घालण्यासाठीं
ऑस्टल्जिन ड्रॉप्स
किं. रु. २–५०

पोटांत घेण्यासाठीं
ऑस्टल्जिन पिल्स
किं. रु. २–५०

बाराक्षार व होमिओपाथिक औषधें योग्य दरांत मिळतील

होमिओ लॅबोरेटरी

१७८, न्यू चर्नी रोड, राममोहन हायस्कूलजवळ, मुंबई ४.


तसं म्हटलं तर ह्या सगळ्या लफड्याशीं आम्हाला कर्तव्य नव्हतं–अन् होतंहि. हरीश आमच्या घरीं वाढला, मोठा झाला. वयांत येतांच वडिलांचे पैसे मिळून वेगळा झाला. शेवंताला पसंत करतांना त्यानें आमचा सल्ला घेतला. साखरपुडा आमच्याच इथें झाला. समोरची जागा संसार थाटायला घेतली. तेव्हां आमची सोबत हीच मुख्य त्यानें पाहिली होती...

खरं म्हणजे हरीशबद्दल आम्हांला ओढ हवी. पण ह्या घोटाळ्यांत आम्हांला कळवळा येई तो शेवंताचा. विचारी चांगल्या घरांतली. थोरामोठ्यांची म्हटलं तरी चालेल. शिकलेली. अन् हाडाची अगदी सरळ. जिथे राहिल तिथे जीव ओतेल. हरीशला ती लाभली तेव्हां वाटलं, हरीशचं आजवर सगळं ठीक झालंय पण त्यावर हा सोन्याचा वर्ख चढला.

जवळजवळ रोज जोडीनें आमच्या घरी यायचे. आमच्याकडून थट्टा करून घ्यायचे हक्कानें हवं ते मागायचे. वाटायचं, दृष्ट लागणारा संसार म्हणतात तो हाच. हरीश फिरतीवर गेला कीं शेवंता रात्रीची आमच्याकडे राहायची. वहिणींच्यांत मिसळून जायची अपरात्रीपर्यंत बोलायची हंसायची.

अशाच एका मुक्कामांत ती अबोल झाली. हंसण्याऐवजी चोरून डोळे पुसू लागली.

आईनें तें हेरलं. "का ग शेवंता, कांहीं होतंय कां तुला ?" तिनें कुशीत घ्यावं तसाच एकदम प्रश्न घातला.

शेवंतानें मान हलवली व ती हंसली. पण तिच्या हृदयातल्या व्यथेचा वास आमच्या घरांत भरून राहिला.

दुसऱ्या दिवशी रात्री ती आईजवळ बोलली. थोडंसं दुःख–थोडी तक्रार. आपला उणेपणा, नवऱ्याची कागाळी हें सगळं टाळण्याची धडपड.

सकाळी ती गेली अन् आमची कमेटी बसली, आई चूल फुंकत होती. मी नि दादा चहाचे रिकामे पेले वाजवीत होतो. मोठी बहीण मोरीत धुण्याशी व धाकटी माजघरांत फणीकरंड्याशी खेळत होती.

हरीश कंपनीकडून मुद्दाम फिरती मागून घेतो. घरीं राहण्यापेक्षां बाहेर भटकणंच त्याला आवडूं लागलंय. फिरतीच्या नोकरीतून लोक पैसे आणतात; हा मात्र जास्तच खर्च करतो. पगार पुरत नाहीं...

आईनें आपल्या भाषेंत शेवंताच्या दुःखाचं सार सांगितलं. नुसती पैशाची ओढाताण असती तर कांहीं तरी उपाय सुचला असता. हरीशला उपदेश करतां आला असता. पण पैशापलिकडे कांहीं असावं असं आम्हां सर्वांना वाटलं. हरीश सारखा घराबाहेर राहातो, परगांवी जातो...

बाई ! सगळ्यांच्या मनांत एकच शंका उद्भवली; अन् आईनें आपल्या अस्सल कोल्हापूरी पद्धतीनें ती स्पष्टपणें सांगितली. दादाला त्याचा शोध घ्यायलाहि फर्मावलं.

अंगवस्त्र ठेवलेलं असलं म्हणजे तें कधी तरी फडफडल्याशिवाय राहत नाहीं. पण गावोगांव लंगडी घालीत हिंडणाऱ्या इसमाच्या रुमालाचं दर्शन कसं होणार ? दादा चौकशी करीत राहायचा नि म्हणायचा, 'असेल–असावं–असणं अशक्य नाहीं—'

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

महिन्याच्या पंधरावीस रात्री शेवंता आमच्याकडेच असे. पण आतां ती नवरा असला तरी रात्री बारा बारा पर्यंत आमच्या घरी राही. हरीश ऑफिसांतून परस्पर कुठेंतरी जाई तो रात्री परते. शेवंताला मग भीति वाटे. एकट्यानें दिवा ढणढण ठेवून कुटवर जागायचं ? ती आमच्याकडे थांबे. हरीश आमच्या अंगणांत येऊनं तिला हाक मारूं लागला कीं मग घरी जाई.

इतका वेळ हा काढतो कुठें ? शेवंता गेली कीं आम्ही अंथरुणांत कोंडाळं करून ह्या गोष्टीचा खल करीत असू. क्लब, पत्ते, दारु, वाईट मित्र, जुगार...एकेका व्यसनावर नाक मुरडीत आम्हीं यादीच्या तळाला आलो, पण उत्तर सापडेना. दादानें एकदा पाठलाग केला तेव्हां हरीश गांवभर-नुसता भटकला, चार जागी चहा प्यायला व परतला—एवढाच रिपोर्ट गोळा झाला. मी तीन चार वेळां त्याच्या मागावर राहिलो—पण हरीश सगळीं व्यसनं करीत होता नि नव्हताहि.

होय हरीशला प्रत्येक व्यसन थोडंथोडं होतं. आम्हाला चर्चा करून व पाठलाग करून जे कळलं नाहीं तें शेवंतानें एका रखरखीत दुपारी आम्हां सगळ्यांना कोरड्या आवाजानें सांगितलं हरीश नायकिणींकडे जातो, क्लबांत पैसे लावून पत्ते खेळतो, मित्राकडे चोरून पितो, ओळखीच्या दुकानांत आकडे लावतो......

थोडं थोडं...पण एकाच जबर व्यसनापेक्षां प्रत्येक वाईट गोष्टींची चव पहाण्याची ही तऱ्हा घातुक होती. घरातल्या सोन्यासामानाला गळती लावीत होती. मुंगीच्या पावलानें हरीश अधःपाताच्या गर्तेत चालला होता. आणि त्याची अर्धांगी झपाट्यानें झिजत होती. कढत होती, रडत होती.

वडिल असते तर त्यांनी हरीशचा कान उपटला असता. पण ते गेले नि आमच्या आईचं आधीच न ऐकणारा हरीश अगदीच उंडारू लागला. त्याला वठणीवर कुणी आणायचा ?—आई संधी मिळेल तशी त्याला टोचे. तेथे पण तो आता आमच्या वाऱ्याला उभा राहीना.

आम्ही बैठकी भरवणं सोडून दिलं. कांहीं घडायचं नि मग शेवंतानें आमच्याकडे येऊन रडायचं; आम्ही तिला समजावायचं व ती गेली कीं चर्चा करायची—ह्यांत अर्थ उरला नव्हता. अती झालं नि शेवंतानें आमच्या घरीं तारखी धाव घेणं सोडून दिलं. बैठक भरवणं टाकून आम्ही येतां जातां शेवंताच्या दुर्दैवाबद्दल उद्गार काढणं सुरू केलं...हरीशनें घरातले जुने शालू विकले...तीन महिन्याच भाडं थकलंय...ऑफिसांत हरीशनें घोटाळा केला...शेवंता दोन दिवस जेवली नाहीं....शेवंताला तो मारीलसुद्धां.

त्याच वेळेला केव्हांतरी आई तळमळून उद्गारली, ' शेवंताला तिच्या नवऱ्यापासून दूर काढली पाहिजे. आमच्या घरीं, तिच्या मामाकडे, कर्व्यांच्या आश्रमांत—कुठं तरी ठेवली पाहिजे. शेवंताला वाचवायचं तर तिचा संसार मोडला पाहिजे...


"माझ्या बागायतीतील बरकतीचें कारण-किर्लोस्कर
—श्री. उटगे

भारतीय शेतकरी-३



"सुमारें नऊ वर्षांपूर्वी मी आरकें किर्लोस्कर ५ हॉर्सपॉवरचें एंजिन नं. १२६५६ ता. १२-३-५१ रोजीं खरेदी केलें. मराठवाडा विभागांतील उमरगा तालुक्यांत किर्लोस्कर एंजिन विकत घेण्याचा उपक्रम माझाच! साहजिकच मी संशयानें थोडासा ग्रासलों होतों.

"आतां लिहिण्यास आनंद व अभिमान वाटतो कीं, या दिवसापर्यंत माझें किर्लोस्कर एंजिन बिनतक्रार काम देत आहे. अेवढेंच कीं एंजिनाच्या ओव्हरहॉल व दुरुस्तीसाठीं या नऊ वर्षांत मला फक्त रु. ४०० खर्च आला. बाकी कोणत्याहि एंजिनाला ओव्हरहॉलिंग लागतेंच !

"किर्लोस्कर एंजिन कोणत्याहि परदेशी एंजिनाइतकेंच सरस आहे अशी माझी खात्री पटली आहे. आपण तर किर्लोस्कर एंजिनावर खूप आहोंत. या एंजिनाचें वैशिष्ट्य म्हणजे याला तेलाचा खर्च कमी येतो, शिवाय तें चालू असतांना त्यावर मुद्दाम देखरेख ठेवावी लागत नाहीं.

"या एंजिनाबाबत तक्रार करावी असें कारणच नाहीं. मात्र माझ्या बागायतीमधील बरकतीचें किर्लोस्कर एंजिन हें वरिल प्रमुख कारण ठरलें आहे."

(शांतलिंगप्पा गुरसिदप्पा उटगे

KO

किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३

किर्लोस्कर एंजिनांची गरज किर्लोस्कर एंजिनेंच भरून काढतात!

KOEL/M-1/60 (I)

TOM & BAY




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बहिणींना व मला कधीपासून हेच वाटत होतं. आईच्याच मुखातून तें आलं हें उत्तमच झालं. आईच्या विचारांची दिशा चुकायची नाहीं ह्यावर आमची सर्वांची श्रद्धा होती. दादाच जरा विरुद्ध होता. कांहीं झालं तरी ती नवरा बायको आहेत. एक होतील. एकत्रच राहायला हवं–कसल्याहि परिस्थितीत...पण दादाचं हें म्हणणं आईनें बंद करून टाकलं.

शेवंताचे हाल पाहवत नव्हते. किती वाळली होती पोर. डोळ्यांभोंवतीं काळे चट्टे, भांगेत पांढऱ्या रेघा, फाटकं विटकं लुगडं नि भुंडा गळा, चेहरा तर सगळ्या चिंतेचा आरसा. सारं मुकाट सोशीत होती बिचारी. आमच्या घरीं रात्रीचं राहायला येणंहि सोडून दिलं होतं तिनें. आतां सोबत नाहीं, तक्रारी नाहींत—काय भोग असतील ते निमुटपणें सहन करायचं...

तिला आमचा विचार कसा सांगायचा ? तिच्याच बऱ्याचा–पण पटवायचा कसा ? हरीशचं वागणं, बोलणं मुकाट सोसणारी ती गरीब बाई–तिला बंड करायला कसं सांगायचं ? हरीशला सोड व सरळ आमच्याकडे येऊन राहा; मग बघूं पुढचं—हे कुणी म्हणायचं ?

बहिणींना हें जमणं शक्य नव्हतं. तेव्हां मग आईच परत सरसावली, 'हऱ्या आज जाणार आहे ना गावाला ?—मग मीच शेवंताकडे झोपायला जाते. रात्री तिच्याशी बोलते. पटवते तिला—' आईनें आतांच पदर बांधला.

रात्रीची आई शेवंताला सोबत गेली अन् आम्ही आपापल्या जागी विचार करीत राहिलो. शेवंता शहाणी असेल तर ऐकेल...तशी ती वैतागली आहे. नवऱ्यावर भडकली आहे–घर सोडायचं नि कुठें मोलमजुरी करून रहायचं म्हणत होती एकदां...हरीशचं नी तिचं भाषणहि नाहीं हल्ली. हरीशलाहि वाटेल, पीडा गेली...दोघी बहिणी आलटून पालटून पुटपुटत होत्या अन् मी नि दादा पहाटेची वाट पहात होतो.

पहांटे आई परतली. आली नि घसमुसळेपणानें कामाला लागली. आम्ही तात्काळ हेरलं कीं आई शेवंताची समजूत पटवूं शकली नाहीं. नसेल—पण मग आईला असला त्रागा करायला काय झालं ? शेवंता सहजासहजी कशी तयार होईल ? आजवर आई चिडली नाहीं नि मग आता ?...

न राहून आम्ही स्वयंपाकघरांत गोळा झालो नि विचारलं, "काय झालं ग ? शेवंता तयार नाहीं ना झाली ? पुन्हां प्रयत्न..."

"नाही रे—" हासडून टाकण्यासारखं आई पुटपुटली. मग मोठा श्वास घेऊन म्हणाली, "मी बोललेंच नाहीं त्याबद्दल. कसं बोलणार ?–शेवंताला दिवस गेले आहेत..."

अरेरे, हरीशनें तिला फसवलं...आतां ती बिचारी पुरतीच अडकली गेली...

•••

# ३

बाई आहेत चांगल्या गोऱ्या, नाकीडोळीं नीटस, उंचेल्या नि आकर्षक. नेसणं जागच्या जागीं, बोलणं हंसणं बेताचं. पण ह्या टापटीपीच्या नि सुढतेच्या गोष्टी प्रथम नजरेंत भरत नाहींत. आधीं जाणवतो तों बाईंचा बुजरेपणा. चालतांना घाबरल्यासारख्या चालतील. बघतील अपराध्यासारख्या. बोलण्यांत कसलाच आत्मविश्वास नाहीं. स्वतःचा विचार, स्वतःची मतं—कांहींच नाहीं. हुकूम पाळायचे. सांगतील तसं वागायचं-वावरायचं–बस्स !

बाईंच्या सासूबाईकडे पाहिलं कीं बाईंच्या डोळ्यांतला भेदरटपणा, वागण्यांतला वेंधळेपणा–सगळ्याचा अर्थ समजतो. सासूबाई म्हणजे घरांतलं मोठं प्रस्थ होतं. आकार मोठा नि अधिकारहि मोठा. म्हटल्या तर तामसी, म्हटल्या तर कर्तृत्ववान्. वाड्यांतल्या बिऱ्हाडांवर जरब, नातलगावर जरब, नवऱ्यावर जरब, मुलांवर जरब. मग सूनबाई भिजल्या पाखरासारखी थरथरत जगे ह्यांत काय नवल ! बाईंचं सगळं आयुष्य त्यांनी उन्हांत ठेवलं होतं. अर्थात् त्याला 'छळ' हा शब्द लावणं म्हणजे सासूबाईंवर अन्याय करण्यासारखं ठरेल. चार चुका सासूच्या, चार सुनेच्या. खरी गोम बाईंच्या लोळागोळा स्वभावाचीच. सासूबाई कशरी म्हणून बाईंच्या मूळच्या गोगलगाय स्वभावाचं अगदीं धिरडं होई. बाई वेंधळेपणानें अधिकच गोंधळ करीत. सासूबाई अधिकच रागावत नि मग बाई जास्त जास्तच चुका करीत, भेदरून जात. हे चक्र आज अनेक वर्षं चालू होतं.

सून म्हणून नव्यानें घरांत आल्या तेव्हां बाईंनीं निमूटपणें सासूबाईंच्या हाताखाली राबायला सुरुवात केली. पहाटे सासूबाईंचा खोकला ऐकल्यावर दचकून उठायचं नि कामाच्या गाड्याला जुंपायचं तें रात्री सासूबाईंचं भजन सुरू होईपर्यंत. कपाटांच्या किल्ल्या त्यांच्या कमरेला नि मुलगाहि त्यांच्या मुठींत. बाईंचा दिवस कसा धाप लागल्यासारखा जाई, भीतिनें, शरमेनें सतरा चुका होता. कपबशी फुटे, स्वैपाक बिघडे, दुपारची झोप आवरत नसे, देवपुजेच्या तयारीत कांहीं कमी पडे–एक ना दोन.

...उन्हाळे नि बाळंतपणें अशी जाऊं लागली, पण घराची घडी एवढीहि सुरकुतली नाही. बाई अंगानें भरल्या-सुटल्या, नवरा मोठा अंमलदार झाला, चार मुलं मोठी होऊं लागली—पण बाईंच्या व्यक्तिमत्वाची पुसट खूणहि कशावर उमटली नाहीं. सारी सत्ता सासूची. त्यांच्याच नावाचं चलनी नाणं. खोकत खाकरत, माजघराच्या एका कोपऱ्यांत बसून ती टुणटुणीत म्हातारी सगळं दळ हलवीत असे.

नुसता सासू-सून संबंध होता तोंवर सगळं सुरळीत चालू होतं. दुभत्याच्या कपाटावर सत्ता नाही, परवानगीशिवाय माहेरी अगर मैत्रिणींकडे जातां येत नाही—याबद्दल बाईंना बोचणी नव्हती. पण मग वर्षं उलटली, नवरा मोठा अधिकारी झाला, मुलं भराभर वाढूं लागली नि बाईंचं लोळागोळा मन ठसठसूं लागलं. आपल्या संसारांत आपल्याला स्थान नाहीं ह्या जाणीवेनें त्या दचकल्या; व मग कष्टी

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

झाल्या. सासूच्या करड्या अंमलामुळें आपल्याला अधिकार नाही, आपले नि मुलांचे कोड पुरवतां येत नाहीत, एवढंच नव्हे तर मुलंहि आपल्याला विशेष मानत नाहीत, सगळेच आपल्याला बाजूला सारतात, ह्या विचारानें त्या खिन्नखिन्न झाल्या.

लग्न होऊन पंधरा सोळा वर्षं झाली, पण अजून 'तांदुळ किती घ्यायचे' नि 'जरा बाहेर जाऊन येऊं का' म्हणून सासूबाईंना विचारायचं; सारखं कुणी बोलेल म्हणून भ्यायचं; मोकळेपणानी स्वैपाकघरांत खायचं नाहीं; माजघरांत झोके काढायचे नाहीं, माडीवर आरशापुढें उभं राहायचं नाहीं; सज्जांत मनाला वाटेल तेव्हां जायचं नाहीं...मुलं मोठी झाली तरी...चाळीशी आली तरी...अर्धं आयुष्य उलटलं तरी...बाईंना आपलं आयुष्य व्यर्थ वाटूं लागलं. संसार करायची, घरवाली म्हणून मिरवायची कधी नाहीं ती तीव्र तहान लागली. आपली अतृप्त इच्छा उरी दाबून त्या एकसारख्या एकांतात डोळे पाणावूं लागल्या.

पण झुरण्या-रडण्यापेक्षां दुसरं कांहीं करणं शक्य नव्हतं. सासूबाई आहेत तोंवर मान वर करणं, शब्द मोठ्यानें उच्चारणं अशक्य होतं. 'आहेत तोंवर—' बाई नकळत दचकूं लागल्या. सासूबाई गेल्या म्हणजे संसार आपला होणार; आपण संसार करणार !...सासूबाईंचं मरण हेच बाईंच्या मनाचं मग धरणं होऊन बसलं.

...कशा मरणार—कधी मरणार सासूबाई !...वेळ जात होता, वर्षं लोटत होती नि बाई विचार करीत होत्या. वाट पहात होत्या. सासूबाईंना मोठं दुखणं येत नव्हतं, त्यांनी अंथरुण धरलं नव्हतं, जगायची त्यांची वासना वाढत होती व भोवतालच्या पसाऱ्यावरची पकड ढिली करायला त्या राजी नव्हत्या. काळाच्या केरसुणीनेंच त्यांचा चिवट देह कोळिष्टकासारखा झटकला जाईल तेव्हाच त्या दूर होणार. त्या केरसुणीची वाट पहाणं एवढंच बाईंच्या हाती होतं. त्या क्षणापर्यंत पोतेऱ्यासारखं जगणं भाग आहे हें त्या ओळखून होत्या. संसार करायची, घराची मालकीण म्हणून मिरवायची वासना वाढत होती अन् ती काळाच्या ठेक्याशीं जखडायला त्या केविलवाण्या धडपडत होत्या.

..पावसाळे उलटूं लागले. सासूबाईंचा दमा बळावूं लागला. सांधे धरूं लागले. अधीरतेनें, भडकत्या मनानें बाई सगळा खेळ बघत होत्या. कामाच्या ओझ्यांनी यजमान दमून जाऊं लागले. घरी हळवे होऊन येऊं लागले. मुलं मोठी झाली. मोठा लग्नाचा झाला. सासूबाईंनी अंथरूण धरलं. बाई सज्जांत नि आरशापुढें उभ्या राहूं लागल्या. आतां थोडे दिवस...थोडीशीच कळ...मग, मग...



—'म्हणजे माझ्या पैशांसाठींच लग्न केलंय कीं काय माझ्याशीं ?'

वेंधळ्या बाई अधिकच गडबडून जाऊं लागल्या. त्यांच्या हातून सारख्या चुका होऊं लागल्या. कुठं काय बोलावं, कुणाशीं कसं वागावं—कांहीं धोरण जमेना त्यांना. सासूच काय पण मुलंहि म्हणूं लागली, काय, एवढंहि कळत नाही तुला ?

—नाही कळत ! कसं वागावं, दुसऱ्याला कसं वागवून घ्यावं हें शिकायची संधीच लाभली नाही कधीं...पण आतां शिकेन मी. मालकिणीसारखी वागेन...

...बाईंचं उदास, बावळं मन तरारून जाई. सगळं त्यांचं होणार होतं. त्या धोरणानें, भारदस्तपणें वागणार होत्या. संसार करणार होत्या. उद्यां सून आल्यावर...

संसार चालवायला आसुसलेल्या बाई सासू व्हायचीहि स्वप्नं पाहूं लागल्या, नुसतंच दुभत्याचं कपाट ताब्यांत नाहीं—तर सूनबाईचें दागिनेहि. बाईंचं मन बहरून येऊं लागलं अन् सासूबाईंचा जाच संपत नाहीं म्हणून जास्तच बावरून गेलं.

...आणिकहि कांहीं ऋतु पालटले अन् थोरल्या लेकानें आपली भावी वधू घरी आणली. बाई शेजारी पापड करायला गेल्या होत्या नि मुलगी सासूबाईंच्या उशाशी बसली होती. सासूबाईंकडे एक लवकरच नाहींसं होणारं माणूस म्हणून कारुण्यानें पाहात होती. सासूबाईंना ती आवडली. डोळे मिटायच्या आधीं नातसून दिसली म्हणून आवडली. तिचे टपोरे, करारी डोळे, कडवं रूप आवडलं. ही वेंधळी नाहीं, आपल्यासारखं तडफेनं व भारदस्तपणें घर चालवेल, ह्या विचारानें त्यांना समाधान वाटलं.

बाई तेवढ्यांत आल्या. सासूबाईंजवळ बसलेली ती मुलगी पाहून दचकल्या. आपल्याला न सांगतां सवरतां ही मुलगी घरांत आली; कायमची ती राहायला येणार; हें त्यांना कसंसंच वाटलं.

सुनेबद्दलची बाईंची स्वप्नं तेव्हांच कुस्करली गेली. अन् संसारांत सत्ता मिळेल ह्याचीहि उमेद गळूं लागली. त्यांची संसार करायची इच्छा अपुरीच राहणार म्हणायची ! आधी सासू मग सून...बाई विलक्षण वेंधळेपणानें त्या मुलीचें करारी डोळे व कडवी जिव्हणी पहात अंधारांत उभ्या राहिल्या...

• • •

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# स्वरब्रह्माचा चित्ररूपी साक्षात्कार



नटरागिणी

## संगीत आणि चित्रकलेचा संगम

भारतीय चित्रकलेंत 'रागमाला' नांवाचा एक मनोहर चित्रप्रकार पहायला मिळतो. मोंगल आणि रजपूत काळांत या 'रागमाला' चित्रांची लोकप्रियता विशेष होती. भारतांतील बहुतेक राजेरजवाड्यांकडे आणि श्रीमान लोकांकडे ही रागमाला चित्रें संग्रही असायचीच. हा चित्रसंग्रह जवळ असणें ही एक रसिकत्वाची खूण मानली जाई आणि म्हणून या चित्रांना देशभर मागणी असे. लांबलांबच्या मागण्या पुरवतां याव्यात म्हणून नामांकित चित्रकारांकडे 'रागमाला' चित्राची टेन्सिल्स् तयार असत आणि त्यावरून हाताखालच्या चित्रकारांकडून भराभर चित्रे तयार करून घेणें त्यांना सोयीचे जात असे! नानाफडणीसांच्या संग्रही हा 'रागमाला' चित्रांचा संग्रह होता आणि सरदार रास्त्यांनी स्वतःच्या मोतिबागेतील भिंतीवर त्यापैकीं कांहीं चित्रीत करून घेतली होती यावरून महाराष्ट्रांतही त्या चित्रांची लोकप्रियता मोठी होती हे सिद्ध होतें.

'रागमाला' चित्रसंग्रहांत संगीतांतल्या विविध रागरागिण्यांना दृश्य स्वरूप दिलेले असून त्या चित्रांचे वर्णन करणाऱ्या छोट्या काव्यपंक्तीहि त्याबरोबर आढळतात. या काव्यपंक्ति संस्कृत, हिंदी, उर्दू अशा विविध भाषेंत त्या त्या भाषिकांच्या सोयीसाठीं लिहिलेल्या आहेत. संगीत आणि चित्रकला यांचा अशा तऱ्हेनें संयोग घडवण्यामागची भूमिका समजून घेणें रसिकांना कुतूहलाचें वाटेल.

## गायकाची दृष्टि

संगीतांतले जाणकार लोक उत्कृष्ट गवयाचे वर्णन करतांना "त्याची नजर फार चांगली आहे." अशी भाषा वापरतांना कधीं कधीं आढळतात. अर्थात् 'गायनांत नजरेचा संबंध कुठें येतो?' असा स्वाभाविकच सामान्यांच्या पुढें प्रश्न उभा रहातो. उत्कृष्ट गवई गायनाला जेव्हां आरंभ करतो तेव्हां संबंध रागाची बांधणी कशी करायची याची पूर्वकल्पना अस्पष्ट स्वरूपांत त्याच्या मनांत असते. स्वरांची आलापी सुरू झाली आणि स्वररंजनानें वातावरण भारलें जाऊं लागलें कीं त्यांच्या पूर्वकल्पनेला स्पष्ट आकार येऊं लागतो. आणि अखेरीस जेव्हां गायन संपवून तो तंबोरा खालीं ठेवतो तेव्हां ,त्यांनी गायिलेल्या रागाचें अलौकिक स्वरूप श्रोत्यांच्या मनःपटलावर पूर्ण उमटलेलें असते.

कुठल्याही रागाची स्वररचना ठरलेलीच असते. ती सामान्य गवयालाहि म्हणून दाखवता येईल. पण अशी स्वररचना केवळ माहीत असणें निराळें आणि त्या स्वरांच्या विविध मिश्रणांनी नादब्रह्माचा साक्षात्कार घडवणें निराळें. रंगपेटींतील सर्व रंग देता येणें यांत चित्रकाराचें कौशल्य नसून त्या विविध रंगांच्या मिश्रणांतून आणि छटांतून एक आल्हाददायी रंगसंगती निर्माण करणें यांत चित्रकाराचे कर्तृत्व आहे. "गवयाची नजर चांगली आहे." या म्हणण्यांतला मतितार्थ असा कीं गायनांतल्या प्रत्येक आलापाची मांडणी करताना अखेरीस एकत्रीत असें जे रागस्वरूप श्रोत्यांच्या पुढें साकार होणार आहे त्याची गवयाला पूर्ण कल्पना असते. हे अदृश्य स्वरूप पाहूं शकेल इतकी त्याच्या अंतःचक्षूची नजर चांगली असते. 'गवयाची नजर' हा शब्द वापरला जातो तो या अर्थी.

## रागाची दोन स्वरूपें

रागविबोधांत रागाच्या स्वरूपासंबंधीं पुढील उल्लेख आहे—

सुस्वरवर्णविशेषं रूपं रागस्य बोधकं द्वेधा।
नादात्मं देवमयं तत्क्रमतोऽनेकमेकं च ॥

भारतीय संगीतकारांनी प्रत्येक रागाची दोन स्वरूपें मानली आहेत. एक नादमयस्वरूप आणि दुसरे देवतामयस्वरूप. अत्युच्च



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

स्वरविलासांत ही दोन्ही स्वरूपें प्रगट होतात असें शास्त्राचें म्हणणें आहे. आकाशांतल्या गंधर्वसृष्टींत प्रत्येक रागाची देवता वसत असते. गायक स्वर-उपासनेनें त्या देवतेला संतुष्ट करतो आणि त्याच्या गायनांत मग ही देवता प्रगट झालेली श्रोत्यांच्या अनुभवाला येते. केवळ स्वररञ्जना म्हणजे रागाचे नादमय स्वरूप होय. त्या नादमयस्वरूपांतून गवयाच्या गानलालित्यानें रसनिष्पत्ती होणें म्हणजेच त्या रागाचें देवतामय स्वरूप प्रगट होणें. निर्जीव शरिरांत आत्म्याचें चैतन्य स्फुरावें तसें गवयाच्या गायनांत रागदेवतेचा अवतार होतांच श्रोते नादब्रह्मांत तल्लीन होतात. रागगायनांत रागाचें नादस्वरूप नित्य पालटत असते. प्रत्येक गायकाच्या वेगवेगळ्या शैलीनें ते विविध रूपें धारण करते. पण अशी नादस्वरूपें बदलत असली तरी रागदेवतेचें स्वरूप कधीं बदलत नाहीं. वेगवेगळी शरीरें धारण करणाऱ्या आत्म्याप्रमाणें हे देवतेचे स्वरूप चिरंतन आहे.

रसहीन गायन करणें हे केवळ दोषास्पदच नाहीं तर हानीकारक आहे. रसहीन गायनानें रागदेवतेला कष्ट होतात. या बाबतींत नारदाची एक आख्यायिका सांगण्यांत येते. आपल्या गायनांतील श्रेष्ठतेचा नारदाला अतिशय गर्व झाला होता. हा गर्व उतरविण्यासाठीं श्रीकृष्णानें एक युक्ति योजली. नारदाला त्यांनीं गंधर्व नगरींत नेलें. तिथें एक अद्‌भुत देखावा नारदाला पहायला मिळाला. अनेक स्त्रीपुरुष तिथें कण्हत विव्हळत होते. कोणाचे हात मोडले होते तर कोणाचे पाय मोडले होते. त्या लोकांची ती दारुण अवस्था पाहून नारदाचें मन कळवळलें. त्यानें मोठ्या आस्थेनें त्या लोकांची चौकशी केली. तेव्हां ते स्त्रीपुरुष त्याला म्हणाले, "आम्ही राग रागिण्या आहोंत. ही आमची अशी अवस्था नारदाच्या गायनानें झाली आहे. नारदाला रसनिष्पत्तीचे शास्त्र माहीत नाहीं. अपुऱ्या ज्ञानावर त्याचे सारें संगीत चालू आहे. अर्थात अशा गायनानें आमची ओढाताण होऊन आमचे हातपाय मोडले आहेत." या प्रकाशानें नारदाचे डोळे उघडले आणि गायनाच्या रसानुकूलतेकडे व शुद्धत्वाकडे तो लक्ष देवूं लागला.

## रागदेवता

राग संगीत गातांना गायकानें त्या रागाच्या देवतेची कदर करावी. ती देवता कशी होणार नाहीं ना याची काळजी घ्यावी. आपलें गायनही त्या देवतेची भक्ति आहे असें समजावें आणि तिचें स्वरूप हृदयांत सांठवावें. गायकाच्या अशा नितांत भक्तीनेच त्याच्या कंठांतून निघणाऱ्या स्वरमालेंत रागदेवता प्रगट होईल.



आसावरी रागिणी

अर्थात रागदेवता मानल्यानंतर तिच्या स्वरूपाचा प्रश्न आला. परमेश्वराचे स्वरूप निराकार मानलें तरी भक्तगणांच्या सोयीसाठीं मूर्ती घडवल्या जातात आणि निराकार परमेश्वराला साकार करण्यांत येतें. गायनांतल्या रागदेवता या परमेश्वराप्रमाणेंच निराकार होत. मधूर स्वररंजना हेच त्यांचे स्वरूप आणि ते स्वरूप श्रोत्यांनी डोळ्यांनी न पहाता कानांनीच अनुभवायचें. परंतु असें असलें तरी गायकाच्या आणि श्रोत्यांच्या सोयीसाठीं 'रागमाला' चित्रांत त्यांना दृश्यरूप देण्यांत आलें आहे.

रागमाला चित्रांतील या रागदेवता म्हणजे 'शंकर, विष्णू, पार्वती' अशा विभुती नसून ती विविध भावचित्रें आहेत. त्यांत प्रेमिकांचे प्रणयाराधन आहे, विरहव्यथितांची करुण चित्रें आहेत. वीरपुरुषांचे पराक्रम आहेत, सृष्टिदेवतेची विविध दर्शनें आहेत, हरीणशावकांची गानलुब्धता आहे, या जीवनाच्या पसाऱ्यांत मनुष्याच्या चित्तवृत्तींना दोलायमान करणाऱ्या लहानमोठ्या प्रसंगांतील विविध भावनांना इथें चित्ररूप दिलें आहे. शृंगार, करुण, वीर, हर्ष अशा विविध रसांचा आविष्कार करणारी ही चित्रें म्हणजेच रागदेवता होत. रागदेवता या विभूति नसून 'रस' आहेत. 'व्यक्ति' नसून 'प्रसंग' आहेत.

## संगीतांतील भावबीजें

विशिष्ट रागगायनानें विशिष्ट वातावरण निर्माण होतें अशी भारतीय संगीताची श्रद्धा आहे. मनुष्याच्या चित्तवृत्ति या गायनानें कधीं प्रफुल्लित होतात; तर त्याच्या मनाला कधीं उगाचच हुरहूर वाटूं लागते. कधीं भोंवतालच्या जगापेक्षां अगदीं निराळ्याच सृष्टींत प्रवेश केल्याचा त्याला भास होतो तर कधीं त्याच्या मनाला निरामय शांतीचा प्रत्यय येतो. श्रोत्यांच्या मनाला अशा तऱ्हेची अनुभूति येण्यांत मैफलीची यशस्विता आहे.

मनुष्याच्या विविध भावनांना जागृत करण्याचें विलक्षण सामर्थ्य रागगायनांत सामावलेलें आहे आणि ते प्रभावी गायकींत अनुभवाला येतेच. तानसेनाच्या गायनानें दिवे लागल्याची कथा मशहूर आहे. संगीतानें रोग बरे होतात, झाडे फळाफुलांनीं समृद्ध होतात, गाई अधिक दूध देतात, हरीण, नाग, मोर यासारखे प्राणी मोहित होतात, हें सत्य शास्त्रज्ञांनींहि कबूल केलें आहे. प्रत्येक रागरचनेंत कांहीं भावबिजें सामावलेलीं असतात. उत्कृष्ट गवयाच्या कौशल्यानें हीं बीजें अंकुरीत होतात, फुलोरतात, आणि श्रोत्यांच्या मानसमंदिरांत त्यांच्या

भय्यासाहेब ओंकार, जी. डी. (आर्टस्)



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बहराचा सुगंध दरवळून जातो. या आधारावर मानवी मनावर होणाऱ्या संगीताच्या प्रभावाचा संबंध भारतीय संगीतकारांनी पुढील प्रमाणे प्रस्थापीत केला आहे.

वसंत रागानें वसंतांतील बहरत्या वातावरणाचा प्रत्यय येतो. मेघरागानें पावसाच्या आगमनाची आणि त्यामुळें सृष्टीला लाभणाऱ्या समृद्धीची जाणीव होते. पूर्वी ही सायंकाळची रागिणी असून अस्तंगत होणाऱ्या दिवसाबद्दल निसर्गाला वाटणारे दुःख तिच्यांत व्यक्त होते. आसावरी रागानें प्रेमभंग झालेल्या नायिकेची विफलता प्रकट होते. तोडी रागांत प्राणीजगाला मोहित करणाऱ्या निसर्गसौन्दर्याची जादू भरली आहे. नटनारायण ही वीररसाची रागिणी, भैरवी ही प्रेम व भक्तीची, मधुमाधवी शांती व तृप्तीची तर ललित रागिणी ही प्रातःकालच्या आगमनानें घडणाऱ्या विरहाची रागिणी आहे. भारतीय संगीतांतील मुख्य सहा राग, व प्रत्येक रागाच्या पांच रागयोपिता म्हणजे छत्तीस रागिण्या. या सर्वांचा अशाप्रकारचा मानवी मनाच्या अनुभूतीशी संबंध जोडला आहे. या अनुभूती रागमालेच्या रूपानें काव्यपंक्तींत वर्णिल्या आहेत आणि चित्रांतून चित्रित केल्या आहेत.

### महोत्सव आणि रागरचना

प्रत्येक रागाची अशी निश्चित भावना ठरवतांना शास्त्रकारांनीं कशाचा आधार घेतला याचा उल्लेख आढळत नाहीं. पण त्या बाबतींत कांहीं अंदाज करणें शक्य आहे.

भारतीय संगीताचे प्राचीन पंडितांनी 'मार्ग' आणि 'देशी' असे दोन प्रकार मानले आहेत. त्यापैकीं रागरचनेची पद्धत देशी म्हणून ओळखली जाते. याचा अर्थ रागसंगीताचा उगम लोकगीतांतून झाला आहे. विविध उत्सवाच्या प्रसंगीं रंगीबेरंगी कपड्यांनी आणि सुंदर अलंकार भूषणांनी नटलेल्या स्त्रीपुरुषांचे समूह वाद्यांच्या तालावर नाचू लागत आणि त्या लयीतून स्वरांच्या सुंदर पंक्ति कंठांतून बाहेर पडूं लागत. सहजतेनें बाहेर पडणाऱ्या उत्सव प्रसंगीच्या अशा संगीतांतून अनेक रागरचना निर्माण झाल्या आहेत.

वसंत ऋतूंत दोलोत्सव साजरा होत असे. उंच वृक्षांच्या फांद्यांना दोर बांधून झोंपाळे तयार होत. सुंदर पुष्पमालांनी हे झोंपाळे सजवले जात आणि तरुण नरनारी या झोंपाळ्यावर चढून उंच उंच झोके घेऊं लागत. त्या आनंदाच्या क्षणीं त्यांच्या



मालव राग

मुखांतून जी गाणी बाहेर पडत त्यांतूनच हिंदोला रागाची रचना निर्माण झाली. 'हिंदोला' रागाचें चित्र झोंपाळ्यावर बसून झोके घेणाऱ्या युगुलाचें काढलेलें दिसतें. हिंदोला राग ज्या वातावरतांत निर्माण झाला त्या वातावरणाची ती चित्रस्मृति आहे.

हिंदोला रागांतून पुढें वसंत रागाची रचना जन्मली. वसंत रागाच्या चित्रांत मोहोरलेल्या आम्र वनांत कृष्ण नाचत असून विविध वाद्यांची साथ गोपिका करीत असल्याचा देखावा दाखविलेला दिसतो.

मेघाच्या स्वागताच्या सोहाळ्यांतून मेघरागाची रचना निघाली तर पिकाच्या हंगामाच्या वेळीं करण्यांत येणाऱ्या लक्ष्मीपूजनाशी श्रीरागाचा संबंध आहे. भारतीय संगीतानें याच धर्तीवर सहाही ऋतूंना सहा राग बहाल केले आहेत.

श्रीरागो रागिणीयुक्तःशिशिरे गीयते बुधैः।
वसन्तः ससहायस्तु वसन्ततौं प्रगीयते ॥
भैरवः ससहायस्तु ऋतौ ग्रीष्मे प्रगीयते ।
पञ्चमस्तु तथा गेयो रागिण्या सह शारदे ॥
मेघरागो रागिणीभिर्युक्तो वर्षासु गीयते ।
नटनारायणो रागो रागिण्यासह हेमके ॥

वसंत वसंत ऋतूंत, भैरव ग्रीष्म ऋतूंत, श्रीराग शिशीर ऋतूंत, पंचम शरद ऋतूंत, मेघ वर्षा ऋतूंत आणि नटनारायण हेमंत ऋतूंत गावयाचे असा संकेत आहे. अर्थात या ऋतूंतील उत्सवाशी या रागांचा संबंध असून रागमाला चित्रांत तो ध्वनित झाला आहे.

### प्राण्यांची गानलुब्धता

प्राणीसृष्टीवर होणारा रागसंगीताचा प्रभावही कांहीं चित्रांशी संबंधीत आहे. तोडी रागिणीच्या चित्रांत वीणेच्या साथीवर गायन करणाऱ्या युवतीच्या गायनानें गानलुब्ध झालेली व भान हरपल्यानें तोंडांत गवताचे घांस तसेच राहिलेली हरिणें दाखविण्यास येतात. हरिणांचे संगीतप्रेम प्रसिद्ध आहे आणि त्यांत काल्पनीकता नसून सत्यता आहे.

११ व्या शतकांत हिंदुस्थानांत आलेल्या अलबेरून या इतिहासकारानें म्हटले आहे कीं, "हिंदुस्थानांतील शिकारी असें सांगतात कीं हरिणीला केवळ नादलुब्धतेनें वश करून सरळ मुदपाकखान्यांत नेता येईल." अलबेरून अरबस्थानांतील शिकारीचा दाखला देताना म्हणतो, "आपले—कडील लोक हरिणाची शिकार करतांना पुढील रीत वापरतात. एखादे हरीण विश्रांति घेत असलेले दिसले म्हणजे शिकारी लांब अंतरावर उभे राहून त्याच्या भोंवती कडे करतात आणि मग एकच स्वर [illegible] वारंवार म्हणून त्या स्वररचनेची हरिणाला संवय करतात. अशी संवय झाली कीं [illegible] एकच स्वर गात वर्तुळाकार उभे राहिलेले [illegible] शिकारी पुढें पुढें सरकूं लागतात. हरीण [illegible] नादस्वरांनीं इतकें लुब्ध झालेलें असतें [illegible] अगदीं जवळून तीर मारण्याइतके शिकारी त्याच्याजवळ आले तरी ते हलत नाही."

हिंदींतील एका सुंदर कवनांत हरिणाचे हें




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

संगीतप्रेम एका कवीनें विशद केलें आहे—

एक पत्र जब खड्खड़ाये हम
भागे सिंहल का द्विप।
सुनके तेरा वेणुस्वर मेरा शिर दिया बक्षिस ॥
शिंग बिके कौडि करना मांस पकायके खावो।
चमड़ा लेके आसन कीजिये वेणुका स्वर
सुनाओ ॥

" एका पानाचा आवाज झाला तरी मी सिलोनला पळून जाणारा ! पण तुझ्या बांसरीचा आवाज ऐकून मी माझे हृदय तुला दिलें आहे. तूं माझी शिंगें विकून पैसा कर, मांस शिजवून खा, माझ्या कातड्याचें आसन कर पण तुझ्या बांसरीचे स्वर ऐकव. "

सुबंधूच्या वासवदत्त नाटकांत " हृष्टकलम गोपिकागीत सुखित मृगयूथे । " म्हणजेच भाताचे शेत राखणाऱ्या स्त्रियांच्या गायनानें भुललेले हरिणांचे कळप " असा उल्लेख आहे. पूर्वीच्या काळीं भातशेतीची राखण करणाऱ्या शेतकन्याच्या मुली हातांत एकतारी घेऊन गीत गायन करीत आणि शेत खाण्यास आलेले हरिणाचे कळप शेत न खाता त्यांचें गायन ऐकत रहात. अशा प्रकारच्या गायनांतूनच 'तोडी' रागिणी जन्माला आली आहे. आणि म्हणूनच तोडी रागिणीच्या चित्रांत 'हरीण व गीत गाणारी स्त्री' दाखवतात.

आसावरी रागिणीच्या चित्रांतहि मलय पर्वतावर चंदनाच्या वृक्षाखालीं नागाशी हितगूज करणारी प्रेमव्यथिता दाखवतात. नागांचें गानप्रेम हरिणाइतकेंच सत्यपरिस्थितीवर आधारलेलें आहे.

कानडा रागाच्या चित्रणांत एका शूर राजपुरुषानें मस्त झालेल्या हत्तीला मारले असून त्याच्या या पराक्रमाचें स्वागत राजभाट घोषगीतांच्या स्वरूपानें करीत असल्याचें दाखवतात. जयघोषाच्या आनंददायक वातावरणांत• मरणपंथास लागलेल्या हत्तीच्या आर्तकिंकाळ्यांचा मिलाफ घडतो. अशा अद्भुत मिश्रणांतून कानडा राग जन्मला. त्यांत आर्त आणि हर्ष अशा दोन्ही भावनांच्या छटा आहेत. कानडा हा कृष्ण या शब्दाचा अपभ्रंश असून गजासुराच्या वधाचा या रागाशी संबंध असल्याचे काहीं टीकाकारांचे मत आहे.

## रागमालेचें कार्य

वरील विचारमंथनावरुन एवढें म्हणायला हरकत नाहीं कीं, रागमालेच्या चित्रांना कांहीं पूर्वपीठिका आहे आणि त्या त्या रागरचनेशी निगडीत अशा कांहीं गोष्टी त्यांच्यांत प्रतिबिंबीत झाल्या आहेत.

अर्थात् ही रागमाला चित्रें म्हणजे त्या रागांचे चित्रांत केलेलें रूपांतर असें म्हणणें कधींच बरोबर ठरणार नाहीं. जेथे शब्द संपतात तिथूनच संगीत सुरू होते. जे शब्दांनी सांगता येत नाहीं तेच स्वरांतून व्यक्त होते. अर्थात अशा स्वरांचा वर वर्णिलेल्या रागमाला चित्रानें अर्थ लावू पहाणें अयोग्यच होईल. संगीताचें शब्दांत अगर चित्रांत स्पष्टिकरण करता येणार नाहीं.

आणि रागमाला चित्रांची ती भूमिकाही नाहीं. रागाचे स्वरूप ती डोळ्यापुढें उभे करीत नाहींत. तर केवळ त्या स्वरूपाची सांकेतीक ओळख ती करून देतात. दगडी मूर्ती म्हणजे ज्याप्रमाणें परमेश्वर नव्हे त्याप्रमाणेंच ही रागमालाचित्रें म्हणजे रागसंगीत नव्हे. खऱ्या भाविकांनी मूर्तीच्या स्वरूपांत गुरफटूं नये तर निरामय परमेश्वराला ओळखण्याचें ते साधन मानावें; तद्वतच रागमाला चित्रांचे. ज्ञानी भक्ताला जशी मूर्तीची गरज नाहीं तशीच उत्कृष्ट गवयाला या रागमाला चित्रांतून रागरस समजून घेण्याची गरज नाहीं. रागमाला चित्रें ही केवळ शिकाऊ साधकांसाठीं आहेत. सुस्वरूपतेला अलंकारांनी भूषीत करावें तशी ही चित्रें हे रागसंगीताचें अलंकरण आहे. रागस्वरूपाचे विषदीकरण हे त्यांचे कार्य नसून रागस्वरूपाला नटवणें हाच त्यांचा उद्देश आहे.

• •



फडकी, अपचन, अंगास खाज उठणें, मलावरोध, सांधे धरणें, वात विकार व कावीळ यांवर
वैद्य-पाटणकर यांचा काढा वापरा
लिहा :—श्रीकृष्ण फार्मसी, १३२।३४ न्यू प्रभादेवी रोड, मुंबई २८.
पा ट ण क र
• ब्राह्मी तेल, • आवळेल तेल, • सुवासिक तेल • गुलाबपाणी, • एरंडेल, • निलगिरी व • दन्तमंजन.
[ हेम पब्लिसिटी, मुंबई २८ ]

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# बेला फूले आधी रात

*हें कल्पनेंतलं रूप घेऊन तूं आलीं नाहींस तर मला वेड लागेल. जर भेटायचं, बोलायचं नव्हतं तर तूं दिसलींस कशाला ? आणि तूं जर दिसत राहिलीं होतींस तर तुला हें रूप घेऊन प्रत्यक्षांत यायलाच हवं. माझ्यासाठीं म्हणून. केवळ माझ्यासाठीं.*

आत्तां कुठं उजाडूं लागलं आहे. ही श्रावणांतली सकाळ माझ्याशीं बोलूं पहात आहे. अंगणांतल्या प्राजक्ताचीं फुलं आत्तां टपाटपा पडूं लागलीं आहेत. माझ्या समोरच्या खिडकींतून त्यांचा सुगंध लाल-चुटुक पांखलांनीं येऊं लागला आहे. श्रावणांतल्या पहांटेच्या कळीचं दिवसाच्या फुलांत रूपांतर होऊं लागतं तेव्हां गंधाची अशीच उधळण होते. रात्रीं चोरपावलांनीं पाऊस येऊन गेला आहे. हवेंत गारवा आहे. बोचणारा आणि तरीहि हवासा वाटणारा. आज मला फार उत्साह वाटत आहे. मनांत जें दाटलं आहे तें सारं रूप घेऊं पहात आहे; त्याला शब्दांच्या जाळ्यांत पकडतां येईल असंहि वाटत आहे.

भल्या सकाळींच लिहायला बसायला मला आवडत नाहीं. जमतच नाहीं मला तें. लिहायची वेळ ही रात्रीची. पहांटेची नाहीं. अशा सकाळची मजा घरांत बसून कळायची नाहीं. नुसत्या गवाक्षांतून तिचं विराट् रूप दिसूंच शकणार नाहीं, कल्पिता येऊं शकणार नाहीं. तिला पहायला, तिच्याशीं बोलायला चार भिंतींच्या बाहेरच पडलं पाहिजे. अंधुक उजेडांत धुक्यानं गिळलेल्या रस्त्यानं चालत राहिलं पाहिजे, पायाला ओल्या मातीचा स्पर्श झाला पाहिजे, साऱ्या अंगानं बोचणारी थंडी प्याली पाहिजे, उलगडती पहांट, पूर्वेला जन्मणारा सोनेरी प्रकाश, उडणारे नानाविध पक्षी, सुस्नात झाडेझुडपें, स्वच्छ चमकते निर्झर, ध्यानस्थ पर्वत पाहिले पाहिजेत, स्वतःला विसरलं पाहिजे...

—पण आज मी लिहायला बसलों आहे. तूं म्हणालीस म्हणून बसलों आहे.

उठल्याबरोबर मला चहा लागतो हें तुला ठाऊक आहे म्हणून तूं आज लौकर उठून चहा बनवून दिलास. तोंड धूत असतांना आंतल्या खोलींतली तुझी चाहूल मी आज जणु नव्यानंच ऐकली. दिवसभर तूं तिथंच असतेस पण इतक्या स्वस्थपणें तुझी चाहूल मी कधीं निरखली नव्हती, तूं तल्लीन असतांना तुझ्या नकळत मी तुला कधीं न्याहाळली नव्हती. इतक्या शांतपणें ती चाहूल मी कधीं कानांनीं टिपली नव्हती. असं कसं झालं ?...या प्रश्नाचं अस्तित्व मला कधींच कसं जाणवलं नाहीं ?

तोंड धुवून झाल्यावर साबणाच्या सुगंधानं माझं मन मोहरून गेलं. त्या सुगंधाची पांढरीशुभ्र नाजुक फुलं त्यावर झोके घेऊं लागली खरखरीत टॉवेलनं तोंड पुसतांना त्या टॉवेलच्या कोरड्या, स्वच्छ वासानं आणि चहाच्या वासानं मला उत्तेजित केलं. चहा घेतला आणि बाहेर जायचे कपडे मी करूं लागलों तेव्हां तूंहि बाहेर आलीस. म्हणालीस " आज नका बाहेर जाऊं, इथंच बसा माझ्याजवळ."

" आणि काय करूं ? " मी विचारलं.

" लिहीत बसा या खिडकीशीं बसून. मला एक कल्पना सुचली आहे. "

" मग तूंच लिही कीं ! "

अंह. कल्पना अशी आहे कीं मी सुरुवात करावी आणि तुम्ही पुढें लिहावं. "

मीं आश्चर्यानं विचारलं, " केव्हां सुचली ही कल्पना ? "

" काल रात्रीं. "

तूं टेबलांतले कागद बाहेर काढलेस. आपलं पेन घेतलंस आणि लिहिलंस—' बेला फूले आधी रात. '

" हें काय ? "

" हें शीर्षक. आतां लिहायला सुरवात करा ना. याचा अर्थ ठाऊक आहे ना ? "

" मोगरा मध्यरात्रींच फुलतो. बरोबर ? "

टेबलाशेजारच्या कॉटवर पडतां पडतां तूं होकार दिलास आणि मी तूं लिहिलेल्या अक्षरांकडे पहात राहिलों.

...तुला उठायला अजून अवकाश आहे. मला चहा देऊन तूं सुरुवातहि करून दिली आहेस आणि आतां तूं पडली आहेस साखरझोंप घेत.

—हेंहि तूं मला कधींतरी सांगितलं आहेस. पहांटे उठून पुन्हां थोडा वेळ पडायला तुला आवडतं म्हणून. खिडकींतून येणारा फुलांचा गंध घेत, सकाळची थंडीच रजई म्हणून अंगावर ओढून घेत.

आज तुला झालंय काय ?








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



शं. ना. नवरे

या समोरच्या कागदांवर हिरव्या शाईंत लिहिलेलीं तिरपीं अक्षरं पहात मी लिहिण्याचा विचार करतोंय्...

वेला फूले आधी रात...मध्यरात्रींच कुणाला नकळत फुलणारा मोगरा...

किती वेडा मी ! इतकं थांबायला हवंय् ? ही श्रावणांतली भली सकाळ, हा प्राजक्ताचा गंध, पक्षांची ही किलबिल...हें ओळखीचं नाहीं ? हो, हो. हें ओळखीचं आहे. ही श्रावणांतली सकाळ माझ्या ओळखीची आहे. हा प्राजक्ताचा गंध माझ्या स्मरणांत आहे.– अजूनहि असाच ओला आणि अितकाच ताजा. ही पक्षांची किलबिल-देखील माझ्या परिचयाची आहे. हें सारं जेव्हां जाणीवपूर्वक मी प्रथम टिपलं तेंव्हांपासून यांचा माझा परिचय आहे. हें जुनंच आहे. फक्त आजचा दिवस नवा आहे. आत्तांची आठवण नवी आहे. हा आजचा दिवस पूर्वी कधीं उगवलेला नाहीं, पुन्हां कधीं उगवणार नाहीं...पण बाकीचं जुनंच आहे. खूप जुनं आहे. अशीच उलगडत जाणारी पहाट, असाच प्राजक्ताचा गंध, पक्षांची अशीच किलबिल आणि तूंहि माझ्या निकट. तुला मी कधीं पाहिलं नव्हतं, तुझं अस्तित्वहि मला ठाऊक नव्हतं पण तरी तूं मला ओळखत होतीस, मी तुला ओळखत होतों. आणि म्हणून तूं आलीस, माझ्या निकट उभी राहिलीस...

....आज असं कसं झालं ? तुला हें सुरुवात करायचं वेड यायला ही श्रावणपहांटच कशी आठवली ? अशाच एका पहाटे तुझी माझी ओळख झाली तेव्हां हाच गंध हवेंत भरून होता. आत्तांहि तोच गंध आहे हवेंत. तेव्हां आपल्या ओळखीची सुरुवात झाली आणि त्या आठवणी लिहायची सुरुवात...

त्यापूर्वी तुला कधीं मी पाहिलंहि नव्हतं. पण ज्या क्षणीं मला तुझी उणीव भासली, त्याच क्षणीं तूं आलीस. जितक्या नाजूक पावलांनीं ती उणीव माझ्या मनांत उतरली तितक्याच हळुवारपणें तूं आलीस. अवचित आलीस.

तेव्हां मी कॉलेजांत होतों, इन्टरला. आमच्या होस्टेलमधलीं मुलं पहांटे धांवायला जायचीं. मीहि जाऊं लागलों. पहांटे साडेचार पांचला उठायचं, स्नान केल्यावर पांढरीशुभ्र हाफ्‌पँट नि त्यावर अर्ध्याहून कमी बाहीचा शर्ट घालायचा, पायांत कॅन्व्हासचे पांढरे बूट घालायचे नि खोलीचं दार उघडून बाहेरच्या काळ्या मखमली थंडगार काळोखांत पाऊल टाकायचं. पहांटेचं जंगलीमहाराज रस्त्याचं रूप अतिशय आल्हाददायक वाटे. थंडींत शांतपणें उभे राहिलेले दिवे, काळा कुळकुळीत लांबलडक स्वच्छ रस्ता, त्या बाजूचे बंगले, त्यांच्या आवारांतून फुललेलीं फुलं, बंगल्यांच्या खिडक्यांतून येत चाललेली जाग, बाजूचं संभाजी उद्यान...प्रसन्न मनानं एक क्षणभर रस्त्यावर उभं रहायचं नि मग त्या आनंदी मनानं पळायला सुरुवात करायची. रस्ता जवळ जवळ मोकळाच असे. कुठं माझ्यासारखे धांवणारे चार दोन तरुण, पहाटेच्या गाडीं-तून उतरलेल्या प्रवाशांना आणणारे टांगे, घोड्यांच्या नालांचा होणारा तालबद्ध आवाज...शहराचं इतकं देखणं रूप मी कुठं पाहिलं नव्हतं ! मी शिवाजीनगर स्टेशनपर्यंत धांवत जाई नि तिथून परते. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूनं परततांना एव्हांपर्यंत बाजूचे आणखी कांहीं बंगले जागे होत असत. कुठं माळ्यांचं शिंपणं चालू झालेलं असे. कुठं गॅलरींत एकादा विद्यार्थी अभ्यास करीत बसलेला असे. ह्या घटकेची जाग फक्त कष्ट करणाऱ्यांचीच.

त्या दिवशीं मी असाच परतत होतों. जंगली महाराजांच्या देवळा-पुढून कांहीं पावलं मीं टाकलीं नि त्यांचा वेग मंदावला. आपोआप



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

नकळत कुठूनतरी मंजूळ स्वर ऐकूं येत होते. बाहेरच्या थंडींत संथपणें ते पावलं टाकीत होते. मी मागं वळलों. एका बैठ्या बंगलीपाशीं थांबलों. आजूबाजूच्या ऐटबाज बंगल्यापुढं ही बुटकी कौलारू बंगली अगदीं वेगळी भासत होती. निवृत्तिवेतन घेतल्यावर सर्वजण पुण्यांत बंगले बांधतात म्हणून कुणातरी गृहस्थानें मिळालेल्या अल्पस्वल्प रकमेंत तो एक बैठी बंगली बांधली असावी. पण बंगलीला गोंडसपणा होता. आवारांतली बाग रम्य होती. फाटकाजवळ बोगनवेल, दोन्हीं कोपऱ्यांत गुलमोहोर, रस्त्याला लागून जास्वंदी, अगस्ता, संकासूर आणि मध्यभागीं पारिजात. त्या बंगलीबाहेर उभा राहून मी गाणं ऐकूं लागलों. रियाज चालला होता. एक पुरुषी दमदार आवाज आणि स्त्रीचा नाजूक, लवचिक—आवाज. त्या दमदार पुरुषी आवाजाचा हात धरून स्त्रीचा तो नाजूक आवाज चालला होता. त्याच्या पावलांवर पावलं टाकीत. मध्येंच तो पुरुषी आवाज इतका उंच जाई कीं, नाजूक आवाजाला थांबावं लागे. मग पुरुषी आवाज पुन्हां मागं येई, त्या नाजूक आवाजाला जणुं म्हणे, "चल वर, घे झेंप. ही चढण वाटते तेवढी कठीण नाहीं. सोपी आहे. ह्या तारसप्तकांतल्या गांधारावर जरा दम घे. मग पुढली झेंप..." नाजूक आवाज त्या मागून धीरे धीरे जात होता.

कुणीतरी वृद्ध गायक जग सोडून जाण्यापूर्वीं आपल्याजवळचा जतन करून ठेवलेला ठेवा त्या गायिकेजवळ देत होता. स्वर्गीत जाण्यापूर्वीं आपल्यापासलं स्वर्गीय संगीत तो पृथ्वीवर ठेवून देणार होता.

त्या स्वरांनीं माझे पाय बांधून टाकले. त्यांनीं माझ्यावर जाळं टाकलं. मला बद्ध केलं. आजुबाजुचं रूप पालटलं होतं साऱ्या आसमंतांत दंवबिंदूसारखे स्वरांचे थेंब साचूं लागले...

...आणि तेव्हां मला तुझी आठवण झाली. त्या सुरांच्या मागून का तू आलीस ? कां त्या पहाटेच्या वाऱ्याबरोबर तू आलीस ? कां प्राजक्ताच्या गंधानं तुला धरून आणलं ? तूं जवळ आलीस. तुला मी तेव्हां प्रथम पाहिलं. प्रथम पाहिलं एवढंच, परंतु आपली फार जन्माची ओळख असल्यासारखी तूं माझ्याकडे पाहून हंसलीस. मीहि हंसून प्रत्युत्तर दिलें. तुझं अस्तित्व मलाच फक्त समजणारं होतं. मी संभ्रमीत झालों. तूं खरंच कां तिथं आली होतीस ? का माझ्या कल्पनांनीं तुझं हें रूप, हा आकार धारण केला ? या पहांटे, या प्राजक्ताच्या सुगंधानं जडावलेल्या वातावरणांत ? पूर्वीं कधीं न पाहिलेली तरीहि ओळखीची वाटणारी तुझी मूर्ति खरीच होती कीं तो भास होता ? तुझ्या अस्तित्वाबद्दल मला शंका होती आणि तरी तू मला भेटत होतीस !

त्या बंगलीच्या फाटकाशीं मी गाणं ऐकत उभा होतों, आणि तूंहि माझ्या खांद्यावर मान टेकून. त्या स्वरांनीं मी आनंदीत होत होतों. त्या आनंदाचं ओझं मला पेलवेनासं झालं आणि त्याच क्षणीं तूं आली होतीस. त्या गायनांतल्या मला आवडलेल्या जागा तुलाहि आवडल्या होत्या. तुझं बिलगणंच मला सांगत होतं तें !

इतक्यांत सूर विरले. मी निघालों. तुला आतां उठवायला हवं होतं... पण एवढ्यांत तूं कुठं गेलीस ? त्या स्वरांबरोबरच विरून गेलीस ? तर मग खचितच त्या स्वरांनीं तुला निर्मिली होती. मला आवडणारी, मोहविणारी...

...आतां तूं पुन्हां भेटणार होतीस ना ? केव्हां भेटणार होतीस ? लगेच दुसऱ्या दिवशीं कीं पुन्हां कधींच नाहीं ?

त्यानंतर रोज पहांटे धांवून येतांना त्या बंगलीशीं मी थांबूं लागलों. तुझी माझी भेटण्याची तीच जागा होती, तोच समय होता. त्या आल्हाददायक वातावरणांतच ते स्वर्गीय स्वर तुझं चित्र रेखाटीत होते. तुला निर्मीत होते. तूं मला भेटत होतीस पण बोलत नव्हतीस. फक्त मला जें वाटत होतं तें तुला कळल्याचं तूं स्पर्शानं मला सांगत होतीस...तूं केव्हां बोलणार आहेस ? कुठले शब्द तूं प्रथम उच्चारणार आहेस ? तुझा स्वर कसा आहे ? मंजूळ असणार हें ठाऊक आहे परंतु मंजूळ म्हणजे कसा ? केदारांतल्या मध्यमाइतका नाजूक कीं कामोदांतल्या पंचमाइतका नखरेल ?...तूं बोलत नव्हतीस निमी नुसत्या कल्पना करीत होतों...

कांहीं दिवसांनीं पहांटेचा कार्यक्रम रद्द झाला. परिक्षा जवळ आली. अभ्यासाची धांवपळ चालू झाली. पहांटे उठल्यावर खिडकीशीं बसून अभ्यासाचा डोंगर रचला जाऊं लागला. तरीहि मधूनच तूं येऊन मला बघून जात होतीस का ? कारण मला तुझी चाहूल लागल्यासारखी वाटे. मी मग अभ्यास थांबवून पुढल्या गॅलरींत येई. पण तूं नसायचीसच तिथं. तिथं असायचा मला आवडणारा चांदण्यांचा पट्टा आणि मांडवावरल्या वेलीच्या फुलांचा नाजूक सुगंध. जातां जातां चांदण्याचा झेला त्या गॅलरींत अडकला होता ? कीं तुझ्यासाठीं चांदण्यानं गालिचा उलगडला होता ? ज्याबर बसून तूं त्या सुगंधाची माला गुंफत बसली होतीस ? त्या चांदण्याकडे पहात मी कांहीं काळ तुझी वाट पहात उभा राही. पण तूं येतच नव्हतीस......

त्यानंतर अचानकपणें भेटलीस ती फर्ग्युसनच्या हिलवर. कोजागिरीच्या रात्रीं. आम्हीं सर्वजण चांदण्यांत फिरायला म्हणून गेलों होतों. नंदानं बांसरी आणली होती. त्यानं बासरींतून सूर काढले आणि काय आश्चर्य ! पांढरेशुभ्र कपडे घालून कालव्याच्या बाजूनं जातांना तूं दिसलीस. इतक्या दुरूनहि मी तुला स्पष्टपणें पाहूं शकलों. रजत रसाची तुझी कांति, त्याच रसाचीं तुझीं वस्त्रं...तूं माझ्याकडे पाहून हंसलीस आणि गेलीस, दूर...खूप दूर...


आतांपर्यंतचीं दीपावली मासिकांची वसघसीत
मुखपृष्ठें तुम्हीं पाहिलींत ना ?
ती सर्व आमच्याकडेच छापलीं !
उत्तम तऱ्हेच्या छपाईसाठीं सदैव सज्ज
★
**साधना आर्ट प्रिंटर्स**
कमर्शियल हाऊस, मेडोझ स्ट्रीट, मुंबई–१.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

—बांसरीचे सूर थांबले होते. मला तुला खूप खूप विचारायचं होतं. तूं कोण आहेस ? अशी मनांतलं रूप घेणारी ? माझ्या आनंदाच्या क्षणीं अचानकपणें अवतरणारी ? माझ्या आवडी-निवडीची आठवण ठेवणारी ?

"...काय पहातो आहेस तिकडे ?" नंदानं मला विचारलं.

"आत्तां काळ्याच्या बाजूनं ती गेली—"

"कोण ?"

"कोण ? मला तरी कुठं ठाऊक आहे ? फक्त ओळख आहे आमची खूप जुनी."

त्यांना मी वेडा वाटलों. त्यांना तर कुणीच दिसलं नव्हतं.

—आनंदाच्या क्षणींच तूं भेटतेस असं मी म्हटलं खरं, पण तूं दुःखाच्याहि क्षणीं आलीस. नन्दानं गळ्याला फांस लावून आत्महत्त्या केली ! साऱ्या दिवसभर मला सुचलं नाहीं. दुःखाचा कडेलोट झाला तेव्हांहि तूं माझ्याकडे धांवत आलीस. तुला माझं दुःख समजलं होतं. तूं माझ्या पाठीवरून हात फिरवलास आणि माझ्या दुःखांतला तुझा भाग तूं घेतलास. खोट्या कोरड्या शब्दांची उगाचच उधळण न करतां.

—सुटीनंतर घरून परत आलों आणि आजारी पडलों. वरच्या आढ्याकडे पहात खोलींत एकटाच मी पडलों होतों. तेव्हां मला भेटण्यासाटीं तूं कितीदां तरी आलीस. माझ्या तप्त कपाळावर आपला तळवा ठेवून तूं तासन् तास बसून राहिलीस. घरच्या प्रेमळ आठवणींनीं मला गदगदून आलं तेव्हां तूंच मला दिलासा दिलास... परिस्थितीनं जेव्हां जेव्हां मी खचलों तेव्हां तेव्हां धीर द्यायला तूंच आलीस. कां ?...कां ?...कां ? माझ्यासाठीं तूं इतका कां टाकतेस ? माझ्या दुःखाचीं झळ तूं कां लावून घेतेस ? इतरेजनां-सारखा फक्त सुखाचाच कां वांटा मागत नाहींस ? आपले संबंध कुठल्या धाग्यांनीं बांधले गेले आहेत ? योग्य त्याच क्षणीं तूं नेमकी कशी येतेस ? किती जन्मांची आपली ओळख आहे ? शब्दांची गुळगुळीत नाणीं न वापरतांहि तूं सारं कसं समजावून घेतेस आणि समजावून देतेस ?.. तूं कोण आहेस ? पुरुषाची प्रकृति ? शिवाची शक्ति ? प्रकाशाची छाया ? माझ्या भावना तुला समजतात तरी केव्हां आणि तूं त्यांत सामावून तरी कशी घेतेस ? पुन्हां वेगळं होतां न येण्याइतकी ? केवड्याच्या कणसांत झोंपलेला सुगंध जागा करून कधीं बाहेर घालवून देतां येईल

...पहांटेचा तो रियाज आतां ऐकूं येत नव्हता. आतां आपली भेट व्हावी कशी ? ती तांबडी, कौलारू बंगली तिथंच होती पण आपली भेट नव्हती. प्राजक्ताचं झाड तसंच उभं होतं, पण त्याला आतां फुलं नव्हतीं, आपली गांठ नव्हती. भल्या सकाळचाच प्रहर असे पण तूं दृष्टीला पडत नव्हतीस...फक्त बाह्य उपचार तुलाहि खोटे वाटतात ? यंत्रासारखं ठरलेल्या ठिकाणीं, ठरलेल्या वेळीं भेटण्यापेक्षां गरज तेव्हां, अडचण तेव्हां, अवश्यकता तेव्हां भेटणं हेंच तुलाहि नैसर्गिक वाटतं ? आनंदाच्या क्षणीं एका ग्रहीतानं त्यांत वांटा मागण्याइतकंच दुःखाच्या क्षणीं झोळी पसरून वांटा मागणं तुला सुख देतं ?...तूं कोण आहेस ?...कोण आहेस तूं ? हल्लीं न

Any surface
that needs painting
needs
Asian Paints



Asian Oil and Paint Co. (India) Pvt. Ltd.
25, Dalal Street, Bombay I.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

भेटणारी...तुला भेटायचं तर भान विसरल्या संगीताचाच आनंद हवा ?

...परंतु तूं पुन्हां भेटलीस. नेहमीं भेटूं लागलीस. कधीं माझ्या आवडत्या नाटकांच्या वेळीं, कधी चांगल्या बोलपटाच्या वेळीं, कधीं नृत्याच्या कार्यक्रमांत, कधीं क्रीडांगणावर, कधीं स्टेशनांवर, कधीं प्रदर्शनांत...

माझ्याबरोबर नाटक-सिनेमांच्या कथानकांनीं तूंहि हर्षित झालीस; नटनटींचे अभिनय पाहून तूंहि माझ्याबरोबर कौतुकाचा भाव दाखविलास. नृत्य पाहून तुझ्याहि भावना उचंबळून आल्या. क्रीडांगणावर मारले गेलेले षट्कार आणि चौकार पाहून माझ्या टाळ्यांत तुझ्याहि टाळ्यांचा आवाज मी ऐकत होतों; तुला आनंदानं नाचतांना मी दुरून पहात होतों. स्टेशनांवर उतरणाऱ्या जोडप्यांना पाहून, कुणाकुणाच्या भेटींचा तिथला आनंद पाहून मलाहि तूं गाडींतून उतरतांना दिसलीस; तुझे हात हातांत धरून मीहि आनंदलों ..परंतु तूं बोलत नव्हतीस. अजून बोलत नव्हतीस...

मी चित्रांच्या प्रदर्शनाला गेलों तेव्हांहि तूं तिथं भेटलीस. चित्रं पाहून माझ्या मनांत उसळलेल्या भावनांचं रूप घेऊन !—तें चित्र अजूनहि मला स्मरतंय. एक उदास संध्याकाळ आणि कोपऱ्यावरून वळत जाणारी बैलगाडी. त्या बैलगाडींत तूं बसली होतीस. तूं गांवीं जात होतीस ? खूप दिवसांसाठीं म्हणून ? तूं मला हात दाखवीत होतीस. डोळ्यांत अश्रु होते नि ते लपवण्याचा तुझा निष्फळ प्रयत्न चालला होता. तुला माझी काळजी वाटत होती; उगाचच वाटत होतं आपण पुन्हां भेटणार नाहीं म्हणून. मी तसाच पहात राहिलों तुझ्याकडे. मलाहि तुझ्या विरहाची कल्पना सहन होईना. वाटलं, पुढं होऊन तुझे अश्रु टिपावेत. पण मीं पुढं पाऊल टाकलं असतं तर त्या चित्रांतून तूं निघून गेली असतीस...प्रदर्शनांतल्या नानाविध चित्रांतून तूं भेटलीस. रांगावलेली, रुसलेली, उदास झालेली, हंसणारी, गाणारी......

उन्हाळ्याच्या सुटींत आम्हीं विद्यार्थी प्रवासाला गेलों. दिल्ली, आग्रा मथुरा...तिथंहि प्रत्येक ठिकाणीं तूं हजर. जिथं जिथं दिव्यत्वाचा, भव्यतेचा साक्षात्कार झाला तिथं तिथं तूं अवतीर्ण झालीस. त्या दिव्यत्वांत, त्या भव्यतेंच तूं रूप घेतलं होतंस...


विविधरंगी छानदार छपाई
आणि वक्तशीरपणा या
वैशिष्ट्यांबद्दल प्रसिद्ध

**आशा प्रिन्टरी**

१३ वी खेतवाडी, मुंबई ४.


त्या वर्षीं मला वाचनाचा नाद लागला. वाचनालयांत असणारीं बहुतेक पुस्तकं माझ्या घरीं येऊं लागलीं. टेबलावरला दिवा रात्र-रात्र जागा राहूं लागला. बाहेरचा झोंबरा वारा खिडक्या दारांतून आंत येई, कधीं पावसाचा शिडकावा होई पण माझं तिकडे लक्ष नसे. त्या पुस्तकांतल्या नायकांबरोबर, नायिकांबरोबर मी रमून जाई. त्यांचे हर्षखेद माझे होत. मी त्यांच्या जगांत वावरत राही.

...मध्यरात्र होऊन गेली होती. नायिकेवर एका मागोमाग होणारे दुःखाचे आघात मला सहन होत नव्हते. माझ्या डोळ्यांत पाणी आलं. डोळे मिटून मी स्वस्थ पडलों; त्या वातावरणांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करूं लागलों; पण त्या लेखकाच्या शब्दांच्या तारांनीं मला धरून ठेवलं होतं. खिडकींतून पाऊस आला. मी जागा झालों आणि पाहिलं तर तिथं टेबलाशीं बसून तूहि हुंदके देत होतीस. तुलाहि तें नायिकेचं (आणि माझंहि) दुःख पहावत नव्हतं... म्हणजे माझ्याबरोबर तूंहि वाचत होतीस ?....तसंच असणार. एरवीं तूं असे हुंदके दिले नसतेस. आणि मग माझा वाचनाचा नाद वाढत राहिला. तुझ्यामुळं. त्या निमित्तानं तूं माझ्याजवळ येऊन बसायचीस. मनांतल्या वादळांत मला सोबत करायचीस.

आणि तरीहि तूं बोलत नव्हतीस. तूं कांहीं सांगितलं नव्हतंस !... आतां मीं थांबणं शक्य नव्हतं. तुझ्या अस्तित्वाची खात्री नसतांनाहि मला वाटूं लागलं. आतां तूं प्रत्यक्षांत भेटली नाहींस तर मला सुचणार नाहीं; हें कल्पनेंतलं रूप घेऊन तूं आली नाहींस तर मला वेड लागेल. जर भेटायचं, बोलायचं नव्हतं तर तूं दिसलीस तरी कशाला ? आणि तूं जर दिसत राहिली होतीस तर तुला हें रूप घेऊन प्रत्यक्षांत यायलाच हवं. माझ्यासाठीं म्हणून. केवळ माझ्यासाठीं. तुला ठाऊक आहे मी असा वेडा झालोंय् आणि म्हणून तूं आतां प्रत्यक्षांत येशील ना ? जेव्हां गरज आहे. आवश्यकता आहे—

* * *

माझ्या धाकट्या भावाची परिक्षा होती. त्याला हॉलवर पोंचवायला मी गेलों होतों. दुपारच्या सुटींत त्याला खायला नेण्यासाठीं म्हणून मी बोलवायला गेलों तर तो कुणाची तरी वाट पहात उभा होता. त्याचा मित्रहि त्याच्याबरोबर येणार होता. मीहि थांबलों.

—आणि केवढं आश्चर्य ! त्या मित्राबरोबर तूं आलीस. प्रत्यक्षांत त्याची थोरली बहीण म्हणून...म्हणजे ? तूं इथं पृथ्वीवर होतीस ? माझ्या कल्पनेंतलं रूप घेऊन तूं आली होतीस ? आणि मला हें माहितहि नसावं ? पण तरीहि मीं तुला पाहिलं होतं ! आपल्या या भेटीपूर्वींच तुला पाहिलं होतं. हें असं कसं झालं ? तेंच रूप, तोच आकार, तेच डोळे, तेच भाव हें कसं झालं...असं घडूं शकतं का या प्रश्नाशीं येऊन ठेपणारी ही घटना घडली होती का ? तुझ्या ह्या धाकट्या भावाला मी पाहिलं होतं, तो कुठं राहातो तें मला ठाऊक होतं. त्या रस्त्यावरून, त्या गल्लींतून, त्या घरावरून मी. कितीदां तरी गेलों होतों. मला कधींच कसा संशय आला नाहीं कीं तूं इथंच आहेस म्हणून ? माझ्या कल्पनेंतली, माझ्या ओळखीची तूं मला न भेटतां तिथं कशी राहूं शकली होतीस ? त्या जुन्या वाड्यांत तूं राहात होतीस हें कसं शक्य होतं ? तूं ह्यापूर्वींच कां भेटली नाहींस ? छेः हें केवढं दुःख दिलंस तूं मला ! आणि हेंहि








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दुःख तूं माझ्या जोडीनंच सहन केलंस ? अस्तित्वांत असूनहि तूं अशी अशरीरिणी होऊन कां भेटत होतीस ? मला हुरहूर कां लावीत होतीस ? तें दुःख अधिक कीं कल्पना नसतांना तूं अशी भेटण्याचं सुख अधिक ? सांग, सांग लौकर. तूं जाणतेस ना सारं कांहीं ?...सांग. तुझा स्वर मला ऐकायचा आहे, तुझे शब्द मला कानांत सांठवायचे आहेत. तुझा स्वर मंजूळ आहे, तो कसा आहे ? केदारांतल्या मध्यमाइतका नाजूक कीं कामोदांतल्या पंचमाइतका नखरेल ?

—' नमस्ते ! ' तूं म्हणालीस.

...म्हणजे ? मी तुला बोलायला सांगितलं तें तुला कळलं होतं ? अप्रत्यक्षांतली तूं आणि आत्तांची, या क्षणींची प्रत्यक्षांतली तूं दोघी एकच आहांत हें खरंच ना ?

तुझा स्वर...तुझा शब्द...केदारांतल्या मध्यमाला लाजवील इतका नाजूक, कामोदांतल्या पंचमापेक्षां नखरेल.

' नमस्ते ' मीं नमस्कार केला.

आपण एकमेकांकडे पाहून हंसलों तेंच हास्य अगदीं तेंच. जन्मोजन्मीच्या ओळखीचं जेव्हां पुरुषाची प्रकृतीशीं ओळख झाली. जेव्हां शिवाला शक्तीची ओळख पटली. जेव्हां प्रकाशाचें छायेशीं नातं जुळलं.

आपण समोरच्या मैदानांत खायला बसलों. मोठ्या वृक्षाच्या छायेखालीं. तू सारखी हंसत होतीस. माझी फजिती केल्यासारखी.

तूं बोलत नव्हतीस. गुणगुणत होतीस. तेच सूर-—त्या पहिल्या पहांटे आपण दोघांनीं ऐकलेले किती हा मिस्कीलपणा ! त्या पहिल्या भेटीची आठवण देण्यासाठीं तूं अशी गुणगुणलीस पण त्याची जरुरी नव्हती. ती आठवण विसरतां येईल का कधीं ? तेव्हां मोठ्यानं ऐकूं येणारे सूर आतां गुणगुणले जात होते. याच सुरांनीं तुझं रूप रेखाटलं होतं आणि हेच सूर पुन्हां तूं गुणगुणत होतीत. गुणगुणणं म्हणजे ऐकल्याची स्वतःशींच आठवण करणं. त्या पहांटे जें अनुभवलं होतं त्याची स्मृति तुझ्या गुणगुणण्यानं जागृत झाली होती.

मी हंसलों. तूंहि हंसलीस.

त्यानंतर आपल्या भेटी होऊं लागल्या. बोलणीं होऊं लागलीं. पण वेडे, प्रत्यक्षांतल्या त्या भेटी, तीं बोलणीं पूर्वींच होऊन नव्हतीं का गेलीं ? मीं वाचलेलीं पुस्तकं तूंहि कशी वाचलीं होतीस आणि मी पाहिलेलीं प्रदर्शनं तूंहि कशीं पाहिली होतीस ? जीं पुस्तकं वाचतांना मी रडलों होतों तिथं तूंहि कशी रडली होतीस ? नन्दाच्या आत्महत्त्येची गोष्ट तुला सांगितली तेव्हांहि तूं स्तब्ध बसून शब्द न उच्चारतां माझं पुन्हां तसंच कसं सांत्वन केलंस ? माझं दुःख स्वतः कसं सोसलंस ?...तो पूर्वींचा भास खोटा होता कीं तुला प्रत्यक्षांत पाहिल्यावर मला तूं जन्माची सोबत वाटलीस म्हणून आतां मला असा भास होत आहे ?...

तूं माझ्या गांवीं आलीस. आपण शेतांतून फिरलों, माळरानावर जाऊन रंगीबेरंगी फुलं जमा केलीं, पावसांत ओलेचिंब झालों. नदींत डुंबलों. फक्त डोंगरावरल्या शंकराच्या देवळांत जायचं राह्यलं होतं.

त्या दिवशीं सकाळींच स्नान आटपून आपण निघालों. तूं सांगितलंस म्हणून पायांत कांहींहि न घालतां. अनवाणी चालण्याची खेड्यांतली मजा मी खेडगांवचा असूनहि मला कधीं कळली नव्हती. जातांना वेलाचीं पानं तूं आठवण करुन दिलीस.

डोंगरावरलं तें दगडी भव्य मंदीर पाहून तूं म्हणालीस, " हेंच तें देऊळ ! "

" म्हणजे काय ? "

" डोंगरावरलं शंकराचं देऊळ म्हटल्यावर माझ्यापुढं जें नेहमीं उभं राहतं तेंच हें देऊळ !

आपण दोघंहि देवाच्या पायां पडलों; बरोबरीनं देवाला बिल्वपत्रं वाहिलीं. जराशानं बाहेरच्या थंडगार कट्ट्यावर येऊन आपण बसलों. तूं अगदीं खुषींत होतीस. मी आश्चर्यानं विचारलं.

Are you really happy ? "

" Sure

" शहरांतल्या तुला इतका आनंद वाटतो इथं ? तुम्हाला आवडणार मेट्रो, चौपाटी व्होल्गा. "




' चुकताय तुम्हीं.' तूं म्हणालीस. "तुमच्याबरोबर वरळीला ' बर्तेरोलीज ' मध्यें जातांना मी जेवढी खुषींत होते, त्याहूनहि मीं आतां अधिक खूष आहे. तिथल्या पिसासारख्या हलक्या इंग्रजी गीतांचे सूर मला जितके आवडले तितकाच या देवळांतला घंटानाद मला आवडला. तिथं

( पान ३० वर )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# टकमक बघणारा



# अंधार

शंकर वि. वैद्य

अनेक वेळां असं घडतं कीं एखादा माणूस आपल्या चांगला परिचयाचा असतो परंतु त्याचं नांव मात्र आपणांस आठवत नाहीं. तं नांव आपल्याला माहित आहे हें सांगण्याची आपण पराकाष्ठा करतो. "अगदीं जिभेवर आहे हो, काय तें ?" असं म्हणतं स्मरणशक्ति एकाग्र करण्याचा यत्न करतों. तरी तें नांव हुलकावण्या देत राहतं. आणि एकदां तें सांपडलं कीं अगदीं मोकळं मोकळं वाटतं. आमच्या या नव्या घरांत मी राहायला आलों तेव्हां प्रशस्त खुल्या खोल्या पाहून मला मनस्वी आनंद झाला. भरपूर मोठमोठ्या खिडक्या, या खोलींतून त्या खोलींत, त्या खोलींतून स्वयंपाकघरांत, तेथून परत व्हरांड्यांत जायला दारांची सोय. म्हणजे तिन्हीं खोल्या इंग्रजी यू च्या आकारांवर बांधलेल्या आणि मध्यंतरी व्हरांडा. जागा मिळाल्यावर एवढा आनंद झाला कीं या खोलींतून त्या खोलींत, त्या खोलींतून व्हरांड्यांत अशा कितीतरी चकरा आम्हीं मारल्या. मुलांनीं तेवढ्यांत शिवाशिवी पण खेळून पाहिली. दोन खोल्यांच्या मधलें दार लावलें. व व्हरांड्यांत येणाऱ्या खोलीच्या दाराला कुलूप घातलें कीं आपणांस हवी ती खोली स्वतंत्र वापरतां येईल असा विचार मी करीत होतों. तेवढ्यांत सौभाग्यवती एकदम शोध लागल्यासारखा आनंद होऊन म्हणाली,

"अय्या जम्मत !"

"कसली जंमत ?" मी साशंक मुद्रा केली.

"अय्या एवढं कसं नाहीं ध्यानांत आलं तुमच्या ! हें पहा इकडून बायका येतील, व्हरांड्यांतनं आंत शिरतील, बाहेरच्या हॉलमध्यें बसतील आणि हळदीकुंकू घेतलं कीं हॉलच्या दुसऱ्या दारानं बाहेर जातील."

सौ. चं म्हणणं समजावून घेत मी हो हो करीत डोकं हालवीत होतों.

बायका घरांत येतील या वाक्याच्या सुरवातीनं माझ्या मनांत जिज्ञासा व आनंदभावना तयार होत होती. पण सौ. च्या डोक्यांत जागेचा विचार हळदीकुंकवाच्या दृष्टीनें चालला आहे हें ध्यानांत येतांच मी जरा निराश झालों.

या जागेंत कांहीं तरी उणीव आहे एवढं मात्र मला जाणवूं लागलं. आसपासचे लोक येत, कोणी मित्रमंडळी येत, 'फार चांगली जागा मिळाली' म्हणून वाखाणणी करीत. घराला शोभा यावी व खाजगीपणा टिकावा म्हणून खिडक्या-दारांना पडदे लावले. परंतु हवा हवी म्हणून पडदे सरकवून ठेवावे लागत, आणि दोन खोल्यामधलीं दारें उघडी ठेवावीं लागत. रस्त्यावरून जाणारा माणूस अगदीं हक्कानें आंतलें सर्व कांहीं न्याहाळीत जाई. वारा यावा म्हणून ज्या खिडक्या उपयुक्त ठरत त्यांच्यांतून दिवसभर ऊन येई. त्या घरांत दुपारची झोप येणें अशक्यच ! जरा आडवे झालें कीं शेजारच्या इमारतींतील पहिल्या दुसऱ्या मजल्यावरल्या लोकांचे डोळे उड्या मारून आमच्या खिडक्यांच्या गजावर येऊन बसत आणि नंतर खोल्यांत येऊन खेळूं लागत. एवढी प्रशस्त जागा मिळूनहि कांहींतरी हरपल्यासारखें वाटे आणि आमचें खेडेगांवांतलें घर आठवे. पांच सहा पायऱ्या चढल्या कीं उंचावर रस्त्यावरला दरवाजा, आंत पाऊल टाकलें कीं अंगण, नंतर एक पायरी चढली कीं पडवी, जरा मंद प्रकाशांत असलेली ओसरी, गार अंधार असलेलें खोल माजघर, मग आंतली ओसरी परत पडवी, नंतर मागलें अंगण आणि मागचा दरवाजा. घरांत शिरूं लागलें कीं प्रकाशाच्या छटा कमी कमी होत जायच्या माजघरांत प्रकाशाची नुसती किलकिली चाहूल. तिथून मागल्या अंगणांत जाईपर्यंत प्रकाशाचा कोन रुंद होत जायचा. त्यांतलें तें माजघर म्हणजे त्या घराचें अंतःकरणच. वाडवडलांच्या अनेक पिढ्यांची रहस्यें भावगंभीर व्यक्तित्व असलेल्या त्या माजघरानें पाहिलेली. बाहेरच्या ओसरीवर कर्ती पुरुष माणसें अनेक गोष्टींचा खल करीत आणि माजघराच्या दाराआड उभें राहून घरांतल्या बायका कान देऊन तें ऐकत. पण माजरानें कधीं चुगली केली नाहीं. गंगू आक्काला पाहायला माणसें आलीं होतीं. बाहेरच्या ओसरीवर बड्या मंडळीची बैठक भरली होती. आक्काला घेऊन सारी बायकामंडळी माजघराच्या छायेखालीं जमा झाली होती. त्यांच्या बांगड्यांची मंद किणकिण त्या अंधारांत ऐकूं येई व अंधाराला संवेदना प्राप्त होत आहे असें वाटे. गांगरलेली आक्का जेव्हां मुसमुसूं लागली तेव्हां शेजारच्या मनुआत्यांनीं तिच्या पाठीवर हात ठेवला आणि समजाव-







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

णीच्या सुरांत म्हणाल्या, 'असं रडू नाहीं बाळ, अशा वेळीं ! डोळे पूस !' धीर देतां देतां मनुआत्यांचाच ऊर भरून आला. त्यांनी डोळ्याला पदर लावला. स्त्रीजीवनांतला अवघडपणा सर्वांनाच जाणवला. विलक्षण ओलाव्यानें तें माजघर डोळे पुशीत होतें. उंबऱ्याची लक्ष्मणरेषा न ओलांडता साऱ्या बायकांनीं तेथूनच दाराआडून आक्काचा नवरा पाहिला. सारें माजघर विलक्षण उत्कंठा आणि हुरहूर या भावनानीं भरून आलं होतं.

डोंगरांत खोल खोदलेलीं लेणी आणि स्तूप पाहिले कीं मला नेहमीं एक प्रश्न पडत असे. अज्ञानांतून बाहेर पडून सत्याच्या प्रकाशाचा शोध घेण्याची जर सारी घडपड करायची तर त्यासाठीं परत या लेण्यांतल्या अंधारांतच येऊन बसण्यांत काय अर्थ आहे ? पण आतां ध्यानांत येतें कीं अंधाराला विलक्षण गोडवा आहे. त्याच्या स्पर्शात मवारी आहे. त्याचें व्यक्तित्व गांभीर्य व शीतलतेनें भरलेलं आहे. विशेष म्हणजे त्याच्या सान्निध्यांत मन अन्तर्मुख होतें. संवेदनांच्या सर्व कला एकाग्र होतात. चिंतन करतांना माणसें डोळे मिटतात तेव्हां या अंधाराच्या आधारानेंच ध्यानस्थ होतात. पापण्या मिटणें म्हणजे अंधाराच्या विराट गाभाऱ्यांत बसून समाधिसुखाचा आस्वाद घेणें ! या नव्या जाणिवेनें मी लेण्यांचा विचार करूं लागलों कीं माजघराच्या अंधाराचें मर्म मला अधिक स्पष्ट होतें. त्याला एक उदात्त छटा प्राप्त होते.

आमच्या या माजघरांत निसर्गानें आणखी एक किमया करून ठेवली होती. दक्षिणायन सुरूं झालें कीं माजघरांतून माळ्यावर जाण्यासाठीं जी झाप होती तेथून उन्हाचा एक गोल चांदोबा भिंतीवर उमटायचा. त्याला भिंतीवर आणून सोडणाऱ्या किरणाचा सोनेरी हात ओकाकून दिसायचा. सूर्य आणखी कलला कीं हा वाटोळा कवडसा गाल काढून हंसायचा. टक लावून बघायचा. आणखी थोडा वेळ गेला कीं त्याचें अंग भिंतीवर ओघळायचें. तेज फिकट व्हायचें. झाडाच्या पानांच्या सावल्या सोनेरी केस सोडून त्या भिंतीवर झुलायच्या झुरायच्या. बारीक जिवण्या काढून कांहीं तरी बोलायची घडपड करीत आहेत असें वाटायचें. हृदयाचें स्पंदन चालतें तसा तो ओघळलेला कवडसा आकुंचन, प्रसरण पावत हालत राहायचा. नंतर प्रकाशाची ओझरती जाणीव शिल्लक राहायची. तीहि सरली कीं, नुसता अंधाराचा डोह ! मनाला विलक्षण चुटपुट लागायची. त्या कवडशाला नाक डोळे होते असं वाटायचं ! अनेक पिल्यांचं मनांत दाटलेलं हितगुज सांगण्याचा प्रयत्न माजघर करीत होतें असं जाणवायचं. त्या कवडश्याशीं विलक्षण मैत्री निर्माण व्हायची.

आजीनं एकदां एका मुलीची गोष्ट याच माजघरांत बसून सांगितली. सावत्र आईनें त्या मुलीला चेटूक करून पक्षीण करून टाकलं. ती पक्षीण नदीवर असायची. राजाचा परीट आला कीं त्याला विचारायची "परीटदादा, परीटदादा, राजा ठीक आहे ? बाळ ठीक आहे ?' परीट हो म्हणाला कीं तिच्या डोळ्यांत अश्रु यायचे व खालीं पडतां पडतां त्याचे हिरे व्हायचे. गोष्ट ऐकून मी माजघरांत झोंपलों होतों. स्वप्नांत मला कोणीतरी विचारलं "राजा ठीक आहे ? बाळ ठीक आहे ?" मी जागा झालों तो मनांत जरा धस्स झालें. भिंतीवर एक प्रकाशाचा लोलक होता. भिंतीच्या डोळ्यांतल्या अश्रूचाच लोलक झाला होता. मांझ्या ध्यानांत आलं त्याला नाकडोळे आहेत. जरा वेळानें त्याचें अंग भिंतीवर ओघळलं. पुसटशाल कांहीं सावल्या त्यांत हलूं लागल्या. चंदेरी जिवण्या. चंदेरी केसं. तेंच हृदयाचं स्पंदन विलक्षण चुळबुळ. माजघर मला अशा रूपानं भेटून गेलं ! दिवसाच्या भेटींत मी त्याला ओळखलं नाहीं म्हणून कीं काय, चांदण्यारात्रीं येऊन गेलं.

घरांत लहान मूल असलं कीं त्याचा पाळणा माजघरांतच असायचा. आजी बसल्या बसल्या झोका द्यायची. रातकिडा किरकिरावा तसा किर्रक् कुई...किर्रक् कुई आवाज करून माजघर बाळाला झोपवायचं. असे कितीक लहानाचे मोठे या माजघराच्या कुशींतच झाले आणि कितीक मोठे त्याच्या मांडीवरच विसावले. आजोबांना या जागेचा फार लोभ होता. त्यांच्या जीवनांतले किती सुख दुःखाचे प्रसंग इथें घडले असतील. आजोबांनीं शेवटीं प्राण सोडला तो इथेंच. त्यांच्या मरणानंतर तेथें ठेवलेल्या पणतींतील ज्योत अंधाराचा पदर डोक्यावर घेऊन येथेंच मूकपणानें जळतांना मी पाहिली होती. आजोबा तेथेंच कोठें तरी आहेत या भासाची सतत जाणीव करून देणारी ही जागा ! ही जागा आतां आजीची आहे. आजीला माजघर कां प्रिय वाटतें हें आतां कळतें. खुटुक करून पडलेला तो म्हातारा जीव जीवनांतल्या किती आठवणी उलट्या पालट्या करून पाहात असेल त्या आठवणींच्या डोहांतून बाहेर यायला ती राजी नसते. तिची लाडकी मांजरी मात्र तिच्याजवळच कोठें तरी बसून मिआव मिआव' करते. माजघरांत गेलं आणि आसपास पाहिलं कीं त्या अंधारांत दोन डोळे रेडिअमसारखे लकाकतात. इकडे तिकडे हालतात. माजघर त्या डोळ्यांनीं रोखून पाहूं लागतें. ओसरीवरल्या घड्याळाचा टक टक आवाज माजघरांत घुमत राहातो.

पण आतां जुने घर डबघाईला आलं आहे. तुळयांना बाक आले आहेत. माजघराचे खांब खचले आहेत. कसेबसे अंग तोलून आहेत. शेजारशेजारच्या वाकलेल्या दोन तुळया म्हणजे तेज संपत चाललेल्या डोळ्याखालच्या काळ्या रेषा आहेत. भिंतीच्या गालांवर पोपसा आला आहे. किलच्या खिळखिळ्या झाल्या आहेत. टवटवीत अंधाराच्या अंगावर प्रकाशाच्या सुरकुत्या उमटत आहेत. उंदीर-घुशी पोखरूं लागल्या कीं विचित्र घरघर जाणवते. मनाला खूप वेळां वाटतें हें सारें सावरावें पण तें जमणार नाहीं. तसें काळज्याच मनांत नाहीं. असं असलं तरी हा ध्यास मात्र सुटणार नाहीं. मनाच्या माजघरांत तो बसून आहे. नव्या जागेचा उथळपणा त्याला रुचत नाहीं. अंतर्मुख करून स्वतःला स्वतःची भेट करवून देण्याचं सामर्थ्य या जागेत नाहीं. उन्हाळ्यात गारवा आणि थंडींत ऊब देणाऱ्या माजघराचं व्यक्तित्व नाहीं ! त्या माजघराची आठवण झाली कीं अंधारांतून चमकत बघणारे लकाकणारे डोळे आपल्याला शोधताहेत असें वाटतें.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*'गाढवाच्या सौंदर्याचा जोंपर्यंत आम्हांस साक्षात्कार होत नाहीं, तोंपर्यंत आमचीं उन्नति होत नाहीं; कारण, निश्चलता आणि स्थिरवृत्ति याबाबतींत हा प्राणी अद्वितीय आहे. सुखाचीं किंवा दु:खाची, लाभाचीं किंवा हानीचीं पर्वा न करणारा हा एकमेव प्राणीं आहे.*



# आमचें राष्ट्रीय जनावर

प्र. श्री. कोल्हटकर

ध्वजवंदनाहून त्या दिवशीं त्रिविक्रम घाईघाईनें घरीं परत येत होता. शनिवारवाड्यावर उंच फडकणारा 'राष्ट्र' ध्वज त्याच्या डोळ्यांना सारखा दिसत होता. तेवढ्यांत एका बाबूनें धक्का मारला. त्रिविक्रमाच्या हातांत पत्रक देत तो म्हणाला, 'हिंदीच "राष्ट्र" भाषा असावी ह्यावर व्याख्यान आहे साब. उद्यां सहा वाजतां, याच ठिकाणीं.'

'कोणाचे रे ?'

'आपले "राष्ट्रीय" नेते—पं. गुलाबदयाळ दासगुप्ता यांचें !' 'हं ! हं !' करीत त्रिविक्रम पुढें जातो न जातो तोंच एका फळविक्यानें त्याला अडविले. 'साब, दोन आण्याला तीन केळी !'

'नको बाबा आतां केळीं-बिळीं !'

'असं काय करतां साब ? आपलं 'राष्ट्रीय' फळ आहे हें. घ्या जरा' असं म्हणून त्यानं तीन केळीं त्रिविक्रमाच्या एका खिशांत कोंबलींच. तेवढ्यांत दुसऱ्या एका पोरानें चिवड्याचा एक पुडा कोंबत म्हटलें, 'अन् हा "राष्ट्रीय" चिवडाहि घ्या, साब. पोरांना आवडतो नि आईबापांना पण !'

"लेकाच्यांनीं 'राष्ट्र' आणि 'राष्ट्रीय' यांचा नुसता बाजार मांडला आहे !" मनाशीं पुटपुटत त्रिविक्रम पुढें चालला. तोंच एक मोठा जबरदस्त धक्का त्याला बसला. तो दणकन् खालीं आपटला. राष्ट्रीय फळाचा रस्त्यावर पार चुराडा झाला होता. राष्ट्रीय चिवडा सर्व रस्त्यावर पसरला होता. भोंवतालचीं राष्ट्रीय माणसें दांत काढून फिदीफिदी हंसत होतीं. असा राग आला त्रिविक्रमाला ! 'अन् हे लेकाचे राष्ट्रध्वज उभारतात नि राष्ट्रदिन साजरे करतात !' असें कांहींसें रागानें पुटपुटत तो उभा राहिला आणि आपणाला धक्का देणारी व्यक्ति कोण आहे हें पाहूं लागला. तों त्याला शांतपणें रस्त्याच्या कडेला उभे असलेलें एक गाढव दिसलें. एका 'राष्ट्रीय' माणसाला जमीनदोस्त करून आपण त्याची केवढी मानहानि केली, ह्याची त्या बिचाऱ्याला जाणीवहि दिसत नव्हती. त्यामुळें त्रिविक्रमाचा पारा अधिकच चढला. दांतओठ खात हातांतल्या छत्रीचा तडाखा तो त्याला देणार इतक्यांत शेजारून जाणारा एक इसम म्हणाला, 'काय राव, कशाला मारतां त्या "राष्ट्रीय" जनावराला. जाऊं द्या बिचाऱ्याला.'

आजूबाजूचे लोक हंसले. त्रिविक्रमालाहि हंसूं आवरेना. त्याची उगारलेली छत्री खालीं आली. घरीं जात असतांना त्याच्या



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मनांत विचार येत होता — खरंच ‘ राष्ट्रीय ’ जनावर हं ! गाढव आणि राष्ट्रीय जनावर ! आणि थोड्याच वेळांत विनोदाची जागा गंभीरतेनें घेतली.

त्रिविक्रमाला वाटूं लागलें कीं खरोखर एकमेव ‘ राष्ट्रीय ’ जनावर म्हणून मान्यता देण्यासारखा हाच काय तो चतुष्पाद प्राणी योग्य आहे. घरांत तो शिरला तों “ गाढव ! गाढव ! ” असें ओरडतच.

\+ + +

जवळच्या वस्तूंची योग्य कदर न करणें हा आमचा फार मोठा राष्ट्रीय अवगुण आहे. त्रिविक्रमानें अनेक उदाहरणांनीं ही गोष्ट पटवून दाखविली आहे. हेंच बघाना, तो म्हणतो, आमच्या ह्या तरुणी त्या परदेशी लिपस्टिकसाठीं मरतात नुसत्या. पण येथल्या येथें असणाऱ्या गुलालाचा, शेंदराचा किंवा कुंकवाचा कोणी उपयोग करतंय त्या ऐवजीं तुम्हांला अमेरिकेंत बनवलेली सुवासिक पावडर लागते अगदीं-पण हातापाशीं कणिक किंवा ज्वारीचें पीठ आहे त्याकडं कां हो लक्ष जात नाहीं ? अहो एवढंच काय, आपली सौन्दर्यशालिनी पत्नी सोडून नट्यांचीं चित्रें मिटक्या मारीत पाहणारे पामर काय थोडे आहेत ? सारांश काय तर ‘ घरकी मुर्गी डाल बराबर ! ’ घरांतल्या गुणी लोकांचं चीज कुणी नि केव्हां केलं आहे ? मोठा विश्वकवि रवीन्द्र ! पण पाश्चात्यांनीं जेव्हां त्याची स्तुति केली तेव्हां आम्ही त्याच्याकडे पाहूं लागलों. मग आमच्या ह्या चतुष्पादेन्द्र गाढवाची शोचनीय अवस्था व्हावी ह्यांत नवल तें काय ! ‘ गाढव ! गाढव ! ’ म्हणून गेलीं कित्येक शतकें आम्ही त्याची नुसतीच अवहेलना केली ! त्याच्या राष्ट्रीय गुणांकडे कधीं लक्षच दिलं नाहीं. उलट त्याचा सदोदित तिरस्कार केला.

आतां सौन्दर्याची देणगी सर्वांसच सारखी मिळेल असें कोणीं सांगितलें आहे ? पण सौन्दर्य नाहीं म्हणून एकाद्याची निंदा करणें ह्यासारखी दुसरी निर्घृण गोष्ट कोणती ? बरं तसं पाहिलं तर गाढव सुंदर नाहीं असं तरी कसं म्हणतां येईल ? हो, कान जरासे लांब आहेत, डोळे थोडेसे बटबटीत आहेत व शरीराची ठेवण यथातथाच आहे. पण म्हणून त्रिविक्रमाच्या मतानें, त्याला कांहीं कुरूप म्हणतां यावयाचें नाहीं. उलट खरें सौन्दर्य साधेपणांतच असतें ही सौन्दर्याची खास राष्ट्रीय व्याख्या मान्य केली तर, त्रिविक्रम ठांसून सांगतो, सौन्दर्याचा पुतळा म्हणून ह्याच राष्ट्रीय प्राण्याकडे बोट दाखवावें लागेल. त्याच्या चेहऱ्यावरची सालसता पहा, नेत्रांतील शांतता पहा, शरीरावरची निश्चलता पहा आणि मग त्याच्या सौन्दर्याची परीक्षा करा. चरबट केसांची झुलपें अंगावर वागवणाऱ्या कुत्र्यांना पाहून आम्ही माना डोलावतो. लांबलचक दांतनखें असणाऱ्या हिंस्र श्वापदाला आम्ही वनराज म्हणून संबोधतों. अवाढव्य शरीराच्या बेढब प्राण्याची गजराज म्हणून स्तुति करतो. परंतु शरीरांतल्या ज्याच्या बिंदूबिंदूंत सात्विकता व सौजन्य भरले आहे त्याची ‘ गाढव ’ म्हणून कुचेष्टा करतो खरोखरच आमच्या बुद्धीचें हें केवढें दारिद्र्य आहे व रसिकतेची केवढी अधोगति आहे ! गाढवाच्या सौन्दर्याचा आम्हांस जोपर्यंत साक्षात्कार होत


sure power for production because

SWARUP

INDUSTRIAL ELECTRIC CABLE

brings it

Snap the switch, and machines spring to life. You are sure the power is flowing, because SWARUP cable never lets you down. It carries electric power safely, surely for production that is vital to our economy.

Tested insulation keeps power flowing. Weatherproof sheathing protects out-door wiring; special CTS sheathing makes underground cables safe, sure, lasting.



Swastik RUBBER PRODUCTS LIMITED, KIRKEE, POONA-3

SRP/E-12/59 TOM & BAY




अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नाहीं तोपर्यंत आमची उन्नति होत नाहीं असा त्रिविक्रमाचा मुळीं सिद्धांतच आहे.

परंतु शारीरिक सौन्दर्यापेक्षां आंतरिक गुणांचे महत्त्व अधिक आहे. त्या दृष्टीनेंहि त्रिविक्रमाच्या मतानुसार गाढवाची योग्यता अनन्यसाधारण आहे. इतक्या विविध थोर गुणांचा समुच्चय असलेला प्राणी (मानव धरून) दुसरा कोणताच नाहीं, असें तो ठासून सांगतो. त्याच्या गुणांचे अनुकरण केले तर अध्यात्मिक, अधिभौतिक, आधिदैविक—सारीं सुखं चुटकीसरशीं आपणांस मिळतील. बिचारं गाढव शांतपणें आम्हांस अहोरात्र स्वतःच्या उदाहरणानें मार्गदर्शन करीत असतें. पण आम्ही तिकडे लक्ष देऊं तर ना! उदाहरणच घ्यायचं तर लाथा झाडण्याचं घेतां येईल. या बाबतींत गाढवाचा हात (किंवा पाय) धरणारा कोणींच नाहीं. तसं पाहवं तर शांतचित्तानें ते समोर उकिरडा फुंकत असतांना तें दिसतें. ना कुणाच्या अध्यांत ना मध्यांत. पण हें शांत कार्य चाललें असतांना कुणाच्याहि ध्यानीं मनीं नसतांना मागच्या दोन पायांचा असा कांहीं तडाखा एकाद्याला देतें कीं बस्! जन्माचीच आठवण राहावी. याला म्हणावी तत्परता, चपळता आणि सहजता! माणसाला देखील किती तरी शिकतां येईल यापासून. आपल्या हाताखालच्या लोकांवर कशा लाथा झाडाव्या यासंबंधीं अधिक चांगलें मार्गदर्शन आणखी कोण करूं शकणार? ह्याच प्रवृत्तीचें उदात्तीकरण म्हणजे हात झाडून मोकळें होणें. काळाबाजार करा, लांचलुचपत घ्या, दरोडे घाला, खून करा–पण गाढवाप्रमाणें आपण त्या गांवचेंहि नाहीं, असें दाखवा. गाढवापासून केवढा हा महाबोध आपणांस मिळूं शकतो!

निश्चलता आणि स्थिरवृत्ति ह्यांतहि हा प्राणी अद्वितीय आहे. सुखाची किंवा दुःखाची, लाभाची किंवा हानीची पर्वा न करणारा हा एकमेव प्राणी आहे. ह्याच्यापुढें गुळाच्या ढेपा टाका किंवा राखेचे ढीग सांडा दोन्हीचाहि आस्वाद सारख्याच आनंदाने तो घेतो. महाराजांची स्वारी बसली म्हणून ह्यास आनंदाच्या उकळ्या फुटत नाहीं कीं कुंभारानें मडकीं वाहण्यास उपयोग केला म्हणून दुःख वाटत नाहीं. त्याच्या समोर कुत्रीं नि डुकरं नाचलीं काय किंवा सिनेनट्यांनीं मुरके मारत नृत्यें केलीं काय—दोन्हीं त्याला समानच. त्याच्या चेहऱ्यावर कधीं हास्याची रेखा उमटत नाहीं कीं शोकाची छाया दिसत नाहीं. खरा स्थितप्रज्ञ आहे तो. आणि हा गुण किती आवश्यक आहे आम्हा भारतीयांना! एकाद्या परक्या देशानें आमच्या देशाचा एकादा तुकडा आपले आंतरराष्ट्रीय प्रेम दाखवण्यासाठीं जरा सांभाळण्यासाठीं घेतला कीं आमचे लोक शिरा ताणताणून ओरडायला लागतात. महाभयंकर विघातक आरोळ्या ठोकतात! शिव! शिव! केव्हां येणार गाढवाची स्थितप्रज्ञता आमच्या अंगीं? जे बाहेरच्या राजकारणांत तेंच घरांतल्या व्यवहारांत. आतां बायकोला काय कामं कमी असतात? कधीं महिला मंडळाची मिटिंग असते तर कधीं भगिनीमंडळाचा सफाईचा (स्वतःच्या चेहऱ्याचा नव्हे) कार्यक्रम असतो. अशा वेळेला भातांत दोनचार खडे राहिले किंवा वरणांत एकाददुसरा केंस तरंगूं लागला, तर तो काय फार मोठा गुन्हा झाला? पण आमचे नवरोजी लगेच डोळे काय वटारतात, नाक काय फेंदारतात आणि बिचाऱ्या गृहस्वामिनीच्या सात कुळांचा उद्धार काय करतात! चंपा तर नेहमीं त्रिविक्रमाला म्हणते, 'त्या गाढवाची तरी जरा अक्कल घ्या.' आतांपर्यंत या गोष्टीचा त्याच्या डोक्यांत प्रकाश पडला नव्हता. पण आतां त्याला आपल्या गाढवप्रिय सौभाग्यवतीचें म्हणणें सार्थ पटूं लागलें आहे.

गाढवाचे अनुकरण ही सुखी संसाराची गुरुकिल्ली आहे असें तोहि अभिमानानें म्हणतो.

गाढवासारखा आत्मसंतुष्ट प्राणी सांपडणें विरळाच. कुत्र्यासारखें भुंकणें त्या बिचाऱ्याला ठाऊक नाहीं. मांजरासारखं चोरपावलांनं जाऊन दहिदूधाचा फडशा पाडण्याची कावेबाज वृत्ति त्याच्याजवळ नाहीं. माकडासारख्या मर्कटलीला करण्याची क्लृप्ति त्याला संपूर्ण पारखी आहे. जें आहे त्याच्यांत खुशी मानणे एवढेंच काय तें विचारें जाणतें.

---

(पान २५ वरून चालू)

हॉटेलांत शिरतांना तुम्हीं माझ्या कंबरेभोंवतीं हात टाकलेला मला जितका आवडला तेवढाच देवळांतला तुमचा दुरावाहि आवडला."

हीं जणुं माझ्याच मनांतलीं वाक्यं माझेच विचार. माझीच आवड. आपण एकजीव झालों. त्याच देवळांत-त्याच क्षणीं.

मी तुला कांहीं विचारण्याचा प्रयत्न केला, तूं म्हणालीस, "कांहीं विचारूं नका. उत्तर द्यायलाच हवं? माझ्या वागणुकीपेक्षां वेगळे शब्द नाहींत माझ्याजवळ."

* * * *

...हें सारं कसं आहे कोण जाणे! काल मला वाटलं, एकादी कथा लिहावी. तूं लिहायला सुरुवात करून द्यावीस आणि मग मी ती पुरी करावी. काल तुला तें सांगायचंच विसरलों मी.

आज पहाटेच मला जाग आली. मी उठलों. तूंहि लगेच उठलीस [illegible]साठीं चहा करूं लागलीस. तोंड धुतां धुतां तुझ्या [illegible] तुझ्या हालचाली न्याहाळीत होतों. तूं मला चहा दिलास. मी बाहेर जायला निघालों तेव्हां तूं मला आडवलंस. म्हणालीस, "आज नका बाहेर जाऊं. इथंच बसा माझ्याजवळ. मला एक कल्पना सुचली आहे. मी आज तुमच्या कथेला सुरुवात करणार आहे. ती कथा तुम्ही पुरी करायची."

असं म्हणून तूं टेबलांतले कागद बाहेर काढलेस. आपलं पेन घेऊन हिरव्या शाईत आणि तिरप्या अक्षरांत लिहिलंस—

'वेला फूले आधी रात...'

मध्यरात्रींच कुणाला न कळत फुलणारा मोगरा...

मीं लिहायला सुरुवात केली.

'...आत्तां कुठं उजाडूं लागलं आहे. ही श्रावणांतली सकाळ माझ्याशीं बोलूं पहात आहे...'

श्रावणांतली सकाळ म्हटल्यावर मला आपली पाहिली भेट आठवली. ती बैठी कौलारू बंगली, तो रियाज, तो प्राजक्ताचा गंध

वेडे, आपल्या प्रीतीचा मोगरा तूं प्रत्यक्ष भेटण्यापूर्वीच फुलला होता, नाहीं का?

• • •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

पण त्याच्या ह्या महान् गुणाकडे कोणीं लक्षच देत नाहीं पण त्याचें अनुकरण करण्याची वृत्ति दूरच राहिली. वास्तविक पाहतां आजच्या या युगांत आत्मसमाधानी वृत्तीची किती आवश्यकता आहे ! स्वतःपुरतें पहावें, मिळालें आहे तेवढ्यांत आनंद मानावा अशी वृत्ति आमची राहिलीच नाहीं. कुण्या फौजदाराला त्याच्या लोकोपयोगी कार्याबद्दल कुणीं प्रसिद्धीची हांव नसल्यानें गुपचुप हजार पांचशें रुपये दिले कीं एकादा असंतुष्ट महात्मा उठतोच. ती लांच दारू-भट्टीप्रकरण दडपण्यासाठीं दिली आहे हें सिद्ध करण्याचा प्रयत्न करतो. काय करायची ही उठाठेव बेट्याला ? गाढव कधीं गाईचा चारा म्हशीनें ओढला किंवा उंदराची शेपूट मांजरानें ओढली म्हणून आकांडतांडव करतें ? मग आम्हांला ह्या नसत्या उठाठेवी कां ? साखरेचें दुर्भिक्ष असतांना एकाद्या व्यापाऱ्यानें जनतेची गैरसोय दूर करण्यासाठीं दिली पांच रुपये शेर भावानें साखर तर लगेच तें प्रकरण पोलीसांत नेण्याची काय जरूर ? आमच्या सामान्य जनतेला ही गाढवाएवढी सुद्धां अक्कल नाहीं. त्या मानानें उच्चपदस्थ लोक थोडे फार तरी गाढवासारखे वागतात. अर्थमंत्र्यानें आपल्या जांवयाला कंत्राटें दिलीं तरी शिक्षणमंत्री कांहीं बोलत नाहीं व शिक्षणमंत्र्यांनीं आपल्या नॉन मॅट्रिक पुतण्याला•परदेशी शिक्षणाची शिष्यवृत्ती दिली तर अर्थमंत्री त्याचें सोयर-सुतक मानत नाहीं. पण हा गुण हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या फारच थोड्या उच्चपदस्थ लोकांनीं आत्मसात् केला आहे. सामान्य जनतेंत जोपर्यंत त्याचा प्रसार होत नाहीं, तोपर्यंत राष्ट्रोद्धार होणार नाहीं असें त्रिविक्रमास वाटतें.

नम्रतेच्या बाबतींतहि आमचा हा राष्ट्रीय प्राणी अग्रेसर आहे. शत्रूला देखील नम्रतेनें वश करा, हा तर आमचा परंपरागत राष्ट्रीय संदेश आहे. द्वेषानें ठोसा देण्यास आलेल्या प्रतिस्पर्ध्यालाहि प्रेमानें आलिंगन द्या ही तर आमची शतकाशतकांची घोषणा आहे. क्रोधाला प्रेमाने जिंका, निष्ठूरतेला नम्रतेनें उत्तर द्या, पाशवी शक्तीचें दमन सहनशीलतेनें करा हे राष्ट्रीय संदेश मूर्तिमंत व्यवहारांत उतरविणारा कोणता प्राणी असेल तर तो गर्द-भराजच होय. बिचाऱ्याच्या पाठीवर कोणत्याहि किती गोणी लादा. कधीं चुकून तो चकार शब्द काढतो तोंडांतून ? शांतपणें आपलें काम करणें एवढेंच तो जाणतो ना ? मालकानें कधी खायला कमी घातलें वा चार दिवस उपाशी ठेवले याची कधीं त्यानें तक्रार केली आहे ? पण आमचा व्यवहार पहाना, अगदीं याच्या उलट ! मालकाने पगारवाढ केली नाहीं कीं उठलोंच आम्ही संप करायला ! पण कधीं आपण विचार करतों कीं त्याच्यामागें कितीं लफडीं असतात ! मोटारी आहेत ! बंगले आहेत ! बायका अन् त्याहि देशी विदेशी ! त्यांपासून झालेलीं पोरं आहेत ! त्या सर्वांचें नि स्वतःचे छंदफंद आहेत ! आणखी किती...किती तरी महान् गोष्टी आहेत ! पण आम्ही क्षुल्लक एकावेळच्या पोटपाण्यासाठीं संप काय करतों नि हरताळ काय पाळतों ! थोडी सहनशीलता म्हणून आमच्यांत नाहीं. एका वेळच्या उपवासानें काय थोडेंच मरतों ? उलट त्यामुळें दुसऱ्या-वेळीं तरी चांगलें भरपूर जेवण जातें. पण आमच्यांत ती सात्विकता राहिली आहे कुठं ? गांधीजींच्या बरोबरच त्यांच्या उपोषणाची महती नष्ट झाली. विघातक, राष्ट्रघातक विचारसरणीचा पगडा आमच्यावर पडला. कोणती गोष्ट सहन म्हणून करायची नाहीं असाच आमचा पायंडा पडूं लागला. मास्तरानें जरा पंधरावीस छड्या ओढल्या कीं पोरं नि पालक त्याला न्यायालयापुढं खेंचूं लागले. ऑफिसरनं स्वतःच्या ( आवश्यक ) वडदास्तीसाठीं कारकुनांवर महिन्या-काठीं कुठं पांच सहा रुपयांची पट्टी बसवली कीं ठोकलीच त्यांनीं वर्तमानपत्रांतून


‘ बरंका आजकाल मला भूकच लागत नाहीं—’

आरोळी ! दुकानदारानं आठाच्या ऐवजीं अधून मधून नोकरांकडून बारा तास काम करुन घेतलं कीं त्यांनी शॉपॲक्टनं मुसक्याळ-लीच त्याची मान. अरे रे ! कुठं ते शिबी, दिलीप, धर्मराज नि राम—सोशिकतेचे महान् पुतळे ! अन् कुठं आम्ही—एवढ्याशा त्रासानं तडफडणारे क्षुद्र कीटक ! फार वाईट वाटतं त्रिविक्रमाला आमच्या अधो-गतीचं. गाढवापासून आम्ही सहनशीलता शिकलों तर निम्मी लढाई जिंकल्याचें श्रेय मिळेल, असें तो म्हणतो.

गाढवाच्या ह्या अनेक राष्ट्रीय गुणांकडे आपण दुर्लक्ष केलं. हा तर त्याच्यावरील अन्याय आहेच. पण खरा घोर अन्याय त्याच्या एका गुणाची अवगुण म्हणून अवहेलना केली त्यांत आहे—इतकीं वर्षे गाढवाच्या आवाजाला बदसूर, कर्णकटु म्हणून आम्हीं नांवें ठेवीत आलों. वास्तविक इतका भारदस्त रणगंभीर व तेजस्वी आवाज फारच थोड्या जनावरांना लाभला आहे. त्रिविक्रमानें अनेक प्रयोगांनीं हीं गोष्ट सिद्ध करून दाखविली आहे. चार चार तास बेंबीपासून आवाज काढून घसेफोड करणारे वक्ते कितीतरी आहेत ! त्रिविक्रमानें टेप रेकॉर्डिंग करून प्रत्यक्ष दाखविले कीं गाढ-वाचा आवाज त्यांच्या मानानें खूपच मधुर आहे. विवाहाच्या मंगलवेळीं मंडपांत हलकल्लोळ माजविणाऱ्या भटांच्या आवाजाची मधुरता गाढवाच्या आवाजाहून कांहीं भिन्न नाहीं. त्रिविक्रमाच्या ह्या मौलिक संशोधनाचा उपयोग होऊं लागलेला दिसतो. कारण एका सिनेनिर्मात्यानें भारतांतील सर्व गाढवांच्या ओरडण्याचे हक्क राखून ठेवल्याचे समजतें. तर दुसऱ्या एकानें त्यांच्या नृत्याचे हक्क राखून ठेवले आहेत असेंहि कळतें. ह्या निर्मात्यांच्या मतानें ह्या नव्या संगीत-नृत्यामुळें सिनेक्षेत्रांत नवीनच युग निर्माण होईल. खरोखरच भारतांतील सौन्दर्यशालिनी नटी ह्या शरीरानें व आवाजानें खऱ्याखुऱ्या सुंदर असलेल्या राष्ट्रीय प्राण्याबरोबर गाणीं म्हणूं लागतील व नृत्य करूं लागतील तो भाग्याचाच दिवस होय ! केवळ सिनेमांतच नाहीं सर्व जगतांतच तो क्रांतीचा दिवस ठरेल ! तीच सांथ इतर क्षेत्रांतहि पसरेल असा त्रिविक्रमास विश्वास वाटतो. अनेक शतकें हालअपेष्टा व मानहानि भोगल्यावर या राष्ट्रीय जनावराचें भाग्य उजाडणार नाहीं तर केव्हां येणार तर !






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# अमंगल जंगल

विदर्भातील चांदा जिल्हा घनदाट जंगलासाठीं प्रख्यात आहे. नाना तऱ्हेच्या वृक्षराजींनीं घनदाट बनलेल्या या भागांतील धानोरा हें एकच छोटें पोलिस ठाणें. तुम्ही आणखी आंत गेलांत तर कपनी नदी लागेल आणि या नदीच्या कांठावर मिछगांव कलान नांवाचें एक आदिवासी खेडें आहे. या आदिवासी खेड्यांतील सर्व खेडूत माडिया जमातीचे आहेत. चांगले सशक्त आणि देखणे, गव्हाळी रंगाचे हे आदिवासी म्हणजे एक चित्रविचित्र वन्य जमात. रात्रौ चांदण्यांत ढोलाच्या तालावरचें माडिया जमातींचें नृत्य म्हणजे एक गंमत असते. शेंकडों आदिवासी स्त्रीपुरुष हातांत हात घालून बेहोष होऊन तालबद्ध नृत्य करीत असतात.

अशा एरव्हीं शांत आणि आनंदी असणाऱ्या मिछगांवच्या जीवनात अस्थिरता निर्माण करणारी एक घटना ४ नोव्हेंबर १९५४ रोजीं घडली. गांवांतील खंडगू माडिया नांवाचा नवजवान एकाएकीं नाहींसा झाला. कुणी म्हणूं लागले कीं खंडगूला वाघानें खाल्लें. कुणी म्हणत कीं तो शहरांत गेला असावा. संध्याकाळीं दिवेलागणीच्या सुमारास गांवांतलीं मुलं एकत्र जमलीं आणि कुजबुजूं लागलीं कीं खंडगूला भुतानें नेलें.

इकडे खंडगूची म्हातारी आई रात्रभर खंडगूची वाट पहात जागी होती. माझा बाळ आतां येईल मग येईल. म्हातारीच्या मनांत नाहीं नाहीं त्या शंका आल्या. तिचा तो एकुलता एक मुलगा आणि आधार होता. दुसरे दिवशीं सकाळीं जंगलांत एके ठिकाणीं घारी आणि गिधाडं घिरट्या घालूं लागलीं. गांवकरी त्या जागेजवळ जमा झाले आणि पाहातात तों खंडगूचें प्रेत. गांवकऱ्यांना फारच वाईट वाटलें. खंडगूसारखा नृत्यकुशल तरणाबांड नवजवान त्यांच्यातून गेला म्हणून ते फार हळहळले. गांवकऱ्यांनीं गांवांतील राखण्याला धानोरा पोलिस स्टेशनवर वर्दी द्यायला पाठवलं. गांवांत शिकलेला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

चांदा जिल्ह्यांतील मिळगांवच्या एका आदिवासी जवानाचा खून झाला. खुनाच्या तपासाच्याकामीं मदत करणारा फॉरेस्ट गार्ड हाच खुनी असेल असं कुणाला वाटलंहि नव्हतं. त्या खुनाचा तपास श्री. एस्. व्ही. गर्दे, इन्स्पेक्टर ऑफ पोलिस सी अँड एस्. रेल्वेज–पुना यांनीं कसा लावला याची ही रोमांचकारी हकिगत......

---

म्हणजे चांगली अक्षरओळख असणारा आणखी एक माणूस होता. तो म्हणजे फॉरेस्ट गार्ड. गांवकऱ्यांनीं त्यालाहि राखण्याबरोबर जायची विनंति केली. कारण पोलिसांच्या भानगडींत एखादा जाणकार माणूस असला म्हणजे बरं. शेवटीं फॉरेस्ट गार्डनें राखण्याबरोबर पोलिस चौकीवर जाण्याला कबूली दिली आणि ते दोघेहि पोलिस ऑफीसरबरोबर परत गांवाकडे यायला निघाले. राखण्यानें त्याला जवळच्या आडवाटेनें आणलं. रस्ता इतका खराब कीं तो पोलीस अधिकारी दोनदां अडखळून पडला देखील. पोलिस अधिकारी गांवांत आला तो सरळ खंडगूच्या झोपडीजवळ गेला. झोपडीच्या दाराशीं त्याचें प्रेत पडलेलें होतें. त्याची आई ओक्साबोक्शीं रडत होती. पोलिस अधिकाऱ्यानें तिचं सांत्वन केलं आणि विचारलं कीं खंडगूला कशामुळें मृत्यु आला ?

"न्याहारी करून लांकूड फांटा आणायला तो जंगलांत गेला तो परत आलाच नाहीं. कोणीतरी त्याला ठार मारलं असावं."

खंडगूचा खून कोणी केला असावा ?

खंडगू बिचारा साधा शेतमजूर. ना त्याची जमीन ना त्याची स्वतःची वाडी. मोठा हुशार आणि धीट पोरगा.

खंडगूच्या शरीराची अधिकाऱ्यानें तपासणी केली. कुणी तरी एखाद्या तीक्ष्ण शस्त्रानें खंडगूचा खून केला असावा अशी त्याची खात्रीच पटली. डोक्यावर, खांद्यावर आणि उजव्या हातावर शस्त्राच्या माराच्या खुणा स्पष्ट दिसत होत्या. हें काम जंगली जनावराचें नक्की नव्हे. किंवा झाडावरून पडून मृत्यु आला अशीहि हीं चिन्हें नव्हतीं. प्राथमिक चौकशी पूर्ण झाल्यावर प्रेत पोस्ट मॉर्टमसाठीं मेडिकल ऑफिसरकडे पाठविण्यांत आलें. त्यानें तपासणी करून असा निर्णय दिला, कीं खंडगूचा खून झाला आहे. छातीवर अकरा वेळां भोसकल्याच्या खुणा होत्या आणि तीन ठिकाणीं फांसळ्या मोडल्या होत्या. कसल्या तरी धारदार शस्त्रानें हा खून करण्यांत आला असावा असें स्पष्ट दिसत होतें.

पोलिस अधिकाऱ्याचें पहिलें काम म्हणजे गुन्हेगाराचा शोध करण्यासाठीं गुन्ह्याच्या जागेची बारकाईनें तपासणी करणें. गांवापासून मैल दीड मैलावर नदीच्या कांठावर चांगलं पांच सहा फूट उंचीचं गवत वाढलं होतं. नदीच्या कांठावर पाण्यासाठीं येणाऱ्या गुरांवर झडप घालण्यासाठीं वाघाला लपून बसायला योग्य जागा होती ती. त्या उंच गवतावर सहा ठिकाणीं रक्ताचा शिडकाव झालेला आढळला. म्हणजे खंडगूनें पळून जाण्याचा प्रयत्न केला असावा आणि खुनी इसमानें आपल्या हातांतल्या शस्त्रानें तो खालीं पडल्यावरहि अनेक वेळां त्याच्यावर प्रहार केले असावेत.

खून कसा झाला असेल बरं ? खुनी माणूस खंडगूच्या पाठोपाठ सावधपणें गेला—आणि नंतर त्यानें खंडगूला ठार मारलें. कदाचित् कसल्यातरी मिषानें बोलत बोलत खुनी माणूस खंडगूला या गवतांत घेऊन आला आणि तो बेसावध असतांना त्याला त्यानें ठार मारलं असावं.

गवताची पूर्ण तपासणी केल्यावर दहा पावलावरच एक रक्तबंबाळ कुऱ्हाड सांपडली. ही कुऱ्हाड खंडगूची म्हणून मागाहून ओळखण्यांत आली. खंडगूसारख्या सशक्त गड्याच्या हातांतील कुऱ्हाड हिसकावून घ्यायची म्हणजे जबर काम. कदाचित ही कुऱ्हाड काढून घेण्यांतच मोठी झोंबाझोंबी झाली असावी.

खंडगूचा तपास करण्यासाठीं बाहेर पडलेल्या गांवकऱ्यांनीहि त्या ठिकाणीं बरीच जा ये केल्यामुळें तपासणीचें काम अधिक बिकट झालें होतें. कांहीं पुरावे नष्ट झाले तर कांहीं पुरावे गोंधळांत टाकणारे ठरले. कांहीं माणसांच्या पावलांचे ठसे एकाच दिशेनें गेले होते. मात्र त्यांत एकाच पावलाचा ठसा वेगळ्याच दिशेनें गेला होता. हे एकाच व्यक्तीच्या पावलाचे ठसे एका नाल्यापर्यंत गेले होते. या नाल्याच्या कडेच्या ओल्या मातींत एका लष्करी बुटाचा तळ स्पष्टपणें उमटला होता. तळाची शिवण, त्यावरचे खिळे त्यांत स्पष्टपणें उमटले होते. खिळ्यावरचीं अक्षरंहि स्वच्छ उमटलीं होतीं. एके ठिकाणीं बुटाच्या तळाला लहानशी चीर पडली होती तीहि या ठशांत स्पष्टपणें दिसत होती.

या पुराव्याचं आतां काय करायचं हें त्या पोलिस अधिकाऱ्याला सुचेना. हा ठसा खूनी इसमाच्या पायांतील बुटाचा कीं खंडगूचा तपास करणाऱ्या कुणा इसमाचा हें ठरविणें जरूर होतें.

इतक्यांत आकाशांत कृष्णमेघांची गर्दी झाली. पाण्याचे कांहीं थेंबहि पडले. थोड्याच वेळांत सोसाट्याचा पाऊस पडणार अशीं लक्षणें दिसूं लागलीं. आणि हा ठशाचा पुरावा आतां जपून ठेवला नाहींतर पावसांत त्याचा-मागमूसहि राहाणार नाहीं असं स्पष्ट दिसत होतं. आणि जवळ तर असं एकहि साधन नव्हतं कीं ज्याच्या साहाय्यानें हा चिखलांतील ठसा जपून ठेवता येईल. पण पोलिस अधिकाऱ्यानें आपलं डोकं लढवलं. त्यानें जमिनीखालून नेवढा चिखलाचा भाग अलगद कापून आपल्या जवळच्या पेटींत ठेवण्याचा निर्णय घेतला. त्यानें मोठ्या चाकूच्या साहाय्यानें तो ठसा अलगद तळापासून कापून काढला आणि एका पुठ्यावर ठेऊन तो पुठ्ठा एका पेटींत ठेवला.

नाल्याजवळ आणखी कांहीं अस्पष्ट ठसे उमटले होते. त्याचा अर्थ असा [illegible] इसम पळत पळत नाल्याच्या कडेला आला असला पाहिजे. नाल्याच्या मध्यभागीं एका

चंद्रसेन








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दगडावर खांचींत रक्त साकळल्याच्या खुणा दिसत होत्या. कदाचित खुनी इसम आपले रक्ताने भरलेले हात अगर कपडे नाल्यांत धुण्यासाठीं आला असावा.

आतां बुटाच्या तळव्याच्या ठशाचा पुरावा हातीं घेऊन त्याच्या-अनुरोधानें तपास लावणें क्रमप्राप्त होतें. त्याप्रमाणें खंडगूच्या शोधार्थ गेलेल्या गांवकऱ्यांपकीं कुणी अशा तऱ्हेचे बूट वापरले होते कीं काय याचा तपास करण्यांत आला. या तपासाअंतीं असें आढळलें कीं तपासासाठीं गेलेल्या आदिवासींपैकीं एकानेंहि बूट वापरले नव्हते. याचा सरळ अर्थ असा कीं खुनी इसमच नाल्याच्या कडेला हात आणि कपडे धुवायला आला असावा.

आतां लष्करी बूट वापरणारा हा खुनी कोण, याचा तपास करणें आवश्यक होतें. त्यांत तीन पर्याय संभवत होते. एक पर्याय असा कीं खुनी इसम कुणीतरी लष्करी माणूस असून सुटीनिमित्त इकडे आला असावा. कदाचित् तो पोलिसखात्यांतहि असणें शक्य होतें. अगर जंगल खात्यांतील किंवा सोशल वेल्फेअर डिपार्टमेंटमधील असावा.

त्याप्रमाणें धानोरा पोलिस स्टेशनमधील सर्व पोलिस अधिकाऱ्यांची दैनंदिनी तपासण्यांत आली तेव्हां असें आढळलें कीं धानोरा पोलिस स्टेशनमधील एकहि पोलिस त्या बाजूला कोणत्याच कामानिमित्त फिरकलाहि नव्हता. शिवाय सर्व पोलिसांच्या बुटांची तपासणी करण्यांत आली त्यांत एकहि बुटाचा तळ त्या नाल्यांत सांपडलेल्या बुटाच्या तळव्याच्या ठशांशीं जुळता नव्हता. मिछगांव आणि आजूबाजूच्या खेड्यांत तपास केला तेव्हां असें आढळलें कीं गेल्या कित्येक दिवसांत या टापूंत एकहि लष्करी माणूस आलेला नाहीं.

जमीनदारी नष्ट झाल्यावर या भागांतील सारें जंगल सरकारच्या जंगलखात्याकडे आलें. धानोरा येथें एक रेंज ऑफीस उघडण्यांत आलें. या रेंजमध्यें दूधमाळा नांवाचा एक विभाग समाविष्ट झाला होता. या दूधमाळाच्या विभागावर शेख इब्राहिम नांवाच्या तरुण फॉरेस्ट गार्डाची नेमणूक झाली होती. पण त्याला राहायला जागा न मिळाल्यामुळें तो मिछगांव येथें महारु माडिया याच्याकडे पेइंग गेस्ट म्हणून राहात होता. शेख इब्राहिमचें काम म्हणजे या भागांत पाहारा ठेवणें. आणि हें काम करीत असतांना त्याच्या बुटाचे ठसे जंगलांत अनेक ठिकाणीं सांपडणें साहाजिकच होतें. त्यामुळें त्याच्या बुटाची तपासणी करण्यांत आली. पण त्याच्या बुटाचे तळ आणि नाल्यांत सांपडलेला ठसा यांत महदंतर होतें. तसं पाहिलं तर शेख इब्राहिमच्या बाबतींत संशयाला मुळींच जागा नव्हती. खंडगूचें प्रेत शोधण्यासाठीं त्यानेंच गांवकऱ्यांना मदत केली. याशिवाय पोलिस स्टेशनवर जाऊन त्यांना तपासण्यासाठीं बोलावण्याचं कामहि त्यानेंच केलें. त्या भागांतील तो एकमेव सुशिक्षित माणूस होता आणि त्याच्या मदतीवर पोलिसांना अवलंबून राहाणें भाग होतें.

शेख इब्राहिमनें आपल्या जबानींत सांगितलें कीं त्यादिवशीं तो आजूबाजूच्या दोन तीन खेड्यांत दौऱ्यावर गेला होता. या विधानाचा खरेखोटेपणा पाहाण्यासाठीं त्या खेड्यांत तपास केला तेव्हां असें आढळलें कीं शेख त्या गांवीं गेलाच नव्हता. यांत संशयास्पद असें कांहीं नव्हतेंच. तरीपण शेखचा पूर्वेतिहास तपासून पाहाणें उपयुक्त ठरेल असा विचार पोलिस अधिकाऱ्याच्या मनांत आला. शेख इब्राहिम हा मूळचा वरोरा तहसील मधील. तो चांगल्या घराण्यांतील आणि इंग्रजी दहावीपर्यंत शिकलेला. शेखच्या बापानें पहिली बायको म्हणजे शेखची आई मृत्यु पावल्यानंतर दुसरें लग्न केलें व त्यानंतर सावत्र आईचें आणि शेखचें पटेना. त्यामुळें त्यानें घरांतून पळ काढला आणि जंगल खात्यांतील एक नोकरी मिळवली. आणि चार महिन्यापूर्वीच शेख महारु माडियाकडे पेइंग गेस्ट म्हणून राहायला आला. साहाजिक महारूची तरुण मुलगी विठी शेखची सरबराई करीत असे. त्यावेळीं मयत खंडगू आणि विठी यांच्या लग्नाच्या वाटाघाटी सुरू झाल्या होत्या. विठीहि नृत्यकुशल तरुणी होती. आणि तिला खंडगू आवडला होता.

दसऱ्याच्या दिवशीं विठी कांहीं तरुण मुलांसह नाचतांना पाहून शेख भडकला आणि त्यानें विठीला ताबडतोब नाच टाकून घरीं जाण्याचा हुकूम केला. नंतर असेंहि आढळलें कीं, शेखनें विठीला सोन्याची अंगठी, सौंडीं इत्यादि वस्तु भेटीदाखल दिल्या होत्या. एकदां विठीशीं बोलत असल्याचें पाहून त्यानें खंडगूच्या मुस्कटांत भडकावून दिली होती. आणि अशा प्रकारें परत विठीशीं बोलतांना आढळलास तर याद राख अशी धमकीहि दिली होती. खंडगूनें हा प्रकार आपल्या जमातीच्या मुख्याला सांगितला पण फॉरेस्ट गार्ड ही आदिवासींच्या मतें एक बडी आसामी असल्यामुळें कुणालाहि शेखला जाब विचारण्याचें धैर्य झालें नाहीं.

आपण खुनाच्या दिवशीं कोठें होतो हें शेखला नीट सांगतां आलें


'सचोटी' हें मान्यवर संस्थेचें ब्रीद असतें. आणि आजवर त्यालाच आम्हीं जागत आलों आहोंत !





अनेकरंगी आकर्षक व उत्कृष्ट ब्लॉक्स बनविण्याचें मुंबईतील प्रख्यात विश्वासार्ह केंद्र.

★

बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ

क्रेसेण्ट चेंबर्स—टॅमरिण्ड लेन, फोर्ट—मुंबई १.

फोन : २५२२४५




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

नाहीं. उलट संध्याकाळीं ओले कपडे घेऊन नाल्याच्या कडेनें घरीं परत येतांना त्याला एका बाईनें पाहिलें होतें. लहुनु गोवारी आणि दाजी माडिया या दोघांनी त्या दिवशीं शेख आणि खंडगू या दोघांना एकत्र असें दुपारीं अडीच वाजतां पाहिले. शेख विनापरवाना जंगली लाकूड तोडल्याबद्दल खंडगूला जाब विचारत होता आणि या दोघांनीं खंडगूला कांहींच शिक्षा न करतां सोडून द्या अशी शेखला विनंति केली होती. हें ठिकाण खंडगूचें प्रेत जेथें सांपडलें तेथून एक फर्लांग-भर अंतरावर होतें. गणू माडिया यानेंहि शेखला ओल्या कपड्यानिशीं घरीं परत येतांना पाहिलें.

यानंतर दुसरा टप्पा म्हणजे विठीची उलट तपासणी. कारण तिच्याकडून बरीचशी माहिती मिळण्याचा संभव होता. विठीच्या ओळखीच्या एका इसमाच्या साहाय्यानें पोलीस अधिकाऱ्यानें विठीला बोलकी केली. खुनाच्या दिवशीं शेख एकटाच अंगणांत अंधारांत बसलेला विठीनें पाहिला. तिनें आंत त्याच्या खोलींत दिवा लावला तर खोलींत त्याचे कपडे वाळत घातलेले. त्याच्या कपड्यांची लागलीच तपासणी केली तेव्हां खमीसावर खांद्याखालीं कांहीं रक्ताचे डाग आढळले. त्याची पँट, पट्टा, यांची सूक्ष्मदर्शक कांचेनें तपासणी केली तेव्हां त्यावर रक्ताचे सूक्ष्म असे डाग आढळले. विठीनें आणखीहि सांगितलं कीं शेखच्या बुटाच्या दोन जोड्या आहेत. ताबडतोब दुसरी जोडी मागवण्यांत आली. त्या जोडीचे तळवे आणि नाल्यांत सांपडलेला ठसा यांच्याशीं तंतोतंत साम्य आढळलें. त्यादिवशीं विठीनें त्याला विचारलें कीं इतके दिवस मी कपडे धूत असतांना आजच तुम्ही आपले कपडे कसे धुतले. त्यावर शेख म्हणाला, " मी खंडगूचा खून केलाय आणि आज रातोरात तूं माझ्याबरोबर निघ. "

आपल्याला गुन्ह्याची कांहींच माहिती नाहीं असें प्रथम शेखनें सांगितलें.

त्याचं म्हणणं असं कीं आपण गांवच्या मुख्याबरोबर दूर गेलों होतों. पण त्याला ज्या आदिवासींनीं पाहिलं होतं त्यांना त्याच्या समोर आणण्यांत आलं तेव्हां तो गडबडला. कधींच चुकूनहि खोटं न बोलणाऱ्या आदिवासींसमोर आपली नाचक्की होतां कामा नये म्हणून त्यानें त्यांच्या विधानाचा इन्कार केला नाहीं. पण शेखनें खरी हकीकत कांहीं नीट सांगितली नाहीं. फक्त विनापरवाना लांकूड तोड केल्याबद्दल आपण खंडगूला जाब विचारला एवढंच त्यांत कबूल केलं. पण खरी घटना ही कीं खंडगूनें त्याला आपलं विठी-बरोबर लग्न ठरलेलं असतांना तूं तिच्याशीं गप्पागोष्टी करावयास कां प्रतिबंध करतोस असा जाब विचारला आणि या भांडणांत शेखनें त्याच्यावर प्रहार केला. पण खंडगू त्या झटापटींत मरण पावल्यावर शेख भानावर आला आणि खंडगूचं प्रेत गवतांत टाकून तो नाल्यावर आपले रक्तानें भरलेले कपडे धुवायला गेला.

अशा तऱ्हेनें एका तरुणीच्या पायीं खंडगूसारखा नवजवान बळी पडला. विठीचं शेखला जबरदस्त आकर्षण होतं. आणि तिच्या प्राप्तीच्या मार्गांतील खंडगू हा कांटा आहे आणि तो उपटून काढण्यासाठीं त्याची धडपड चालली होती.

[ बॉंबे पोलिस जर्नलच्या सौजन्यानें ]

• • •




**How shall we say it?**

That is easy. Say it the Tom-&-Bay way! Whatever your advertising message, it is how you say it that counts. To say it in the most telling manner, to get the results you want, say it to.....

PRESS ADVERTISING

FOLDERS

POSTERS

PUBLICITY FILMS

OUTDOOR CAMPAIGN




CALENDARS

PACKAGING

**TOM & BAY (ADVERTISING) PRIVATE LTD.**

POST BOX 574, LAXMI ROAD, POONA 2

Graphis: Alan








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



ह्या विहिरींचें मधूर पाणी, आख्या पन्हाळ्याला पुरून उरत होतें! पण आज ह्या जीवन-दाई पडीकझडींक विहिरींत, काळ्याकुट्ट अंधाराशिवाय कांहीं एक उरलेलें नाहीं!

# अंधार बाव

सौ. नलिनी सुखटणकर

मी आज पन्हाळ्याला येऊन राहिलो आहे, श्रीमंत भाऊसाहेब इनामदारांना घेऊन! हवेचें ठिकाण म्हणून कांहीं मी त्यांच्यासह पन्हाळ्यावर मुक्काम ठोकलेला नाहीं! पन्हाळ्याची भरभराट होत असेल, मुख्य मंत्र्यांनी भेट दिल्यापासून, पन्हाळ्याच्या कीर्तीतही भर पडली असेल! परंतु श्रीमंत भाऊसाहेबांना मात्र दिवसेंदिवस निकृष्टा-वस्था प्राप्त होत आहे! पडझड झालेल्या किल्ल्याप्रमाणें त्यांचे एकएक अवशेष, निखळून पडत आहेत? त्यांच्या मागची श्रीमंत ही उपाधी नाममात्र राहिली आहे!

भाऊसाहेबांना मी मृत्यूपासून वाचवण्या-करतां मी घेऊन आलो, पण ती गोष्ट अशक्य कोटींतील आहे हें आतां मला स्पष्ट दिसत आहे! सारे प्रयत्न निष्फळ होताहेत, कारण वांचवून घ्यायची भाऊसाहेबांच्या, मनाचीच तयारी नाहीं! त्यांच्या कोल्हापूरच्या रहात्या घरांत, कुटुंबियांच्या कड्यांत, मला त्यांच्यावर डॉक्टर ह्या नात्यानें उपाय करतां आला असता! परंतु तेथें राहिल्यानें त्यांना अधि-कच वेदना होत आहेत, हें स्पष्ट दिसून आल्यामुळें, मी त्यांना इथें घेऊन आलों! रोजच्या, भंवतालच्या समाजापासून दूर पळून जाण्याकरतां, भूतकाळांत विलीन झालेल्या जिव्हाळ्याच्या स्मृतीं, विस्मृतींत जमा करण्याकरतां आणि तरीहि, त्या पन्हाळ्याशीं निगडींत झालेल्या आहेत म्हणूनच, मी भाऊसाहेबांना घेऊन, त्यांच्या उरल्यासुरल्या घटका-पळांकरतां इथें आलों आहे! पुन्हां सजीव झालेल्या त्या स्मृतींचा आक्रोश, पन्हाळ्याच्या दरीकपारींतून घुमून राहिला आहे! पन्हाळ्यावर रुईया-लोहियांचे सुशोभित, सुसज्ज आणि सुंदर बंगले अस-तील, पण भाऊसाहेबांचा बंगला त्यांच्या-सारखाच मोडकळीला आलेला आहे! असेल, पण त्याच्यांतच त्यांच्या नि मासूमच्या संसाराचें सुंदर स्वप्न सांठवलें होतें ना? ह्याच जुनाट बंगल्यांत, भाऊसाहेबांनी सौख्याचा उच्चबिंदू गाठला होता ना? मग झालं तर!

पन्हाळ्याच्या सरकारी शॅक्सचें आणि मयूर बनाचें, दगडी दरवाजांचे नि गोपालतीर्थ बागेचें, वेगवेगळ्या पॉईंटांचें कौतुक तुम्हांला वाटत असेल! मिशनऱ्यांच्या बाजीप्रभू पाइंटवरून, तुम्ही गंमत म्हणून आपली नजर खालीं गरंगळत लोटून दिली असेल! कॉफी चहाच्या नव्या नव्या मळ्यांत रमलां असाल प्रभातकालीं शीतल धुक्याच्या थंडगार स्पर्शानें, तुमच्या अंगावर रोमांच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

उठले असतील. दरी कपारींतून घुमणाऱ्या सुसाट वाऱ्यानें तुमचे कपडे उडवले असतील स्वैरतेच्या स्वच्छंदी जीवनाचा ओझरता स्पर्श, तुमच्या कोंदटलेल्या मनाला जाणवून दिला असेल ! भाऊसाहेबांचें जीवन असेंच तुफानी होतें. त्यांनीं मनाला वाटलें, तें धडाडीनें कृतींत उतरवलें !

वर्षानुवर्षें काळाचे थर चढलेल्या राजदिंडीच्या कणखर पण वृद्ध फत्तरावर, तुम्ही खुशाल नवलाची नजर रोखा ? पुसाटी पॉईंटच्या पाणपोईला तोंड लावून गारीगार व्हा, नी उत्साहानें सूर्य प्रकाशांत तळपणाऱ्या दूरवरच्या क्षितिजाचा ठाव घ्या ? कासावी नदीवर तरंगणाऱ्या तुषारांच्या मेघखंडावर बसून, हलकेफुलके पिसाच्या हृदयानें, कल्पनेचे हिंदोळे झुलवा !

...भाऊसाहेबांच्या आयुष्यांत मात्र, पन्हाळ्याची घनदाट वनराई कधीच विरळ झाली आहे ! आजही वाघ दरवाजाखालील पाण्याच्या लोटाबरोबर, आवरलेल्या, बांध घातलेल्या भावना उस्फोट कैरून सैरावैरा धावूं लागतात ? ह्या वाघ दरवाजाखालींच, पाण्याला येणारा एक वित्रस्या वाघ, भाऊसाहेबांनीं लीलेनें उडवला होता. भाऊसाहेबांच्या जीवनांतला तो कालखंडही संपला, नी तो किल्ले पन्हाळाही बदलला ! रहातां रहातां राहिली ती सर्वांवर मात करणारी, मगरीप्रमाणें आ पसरून गिळायला बसलेली, अकाळविकाळ, भेसूर, अंधारवाव...

ह्या विहिरीचें मधूर पाणी, आख्या पन्हाळ्याला एकेकाळीं पुरून उरत होतें ! पण आज ह्या जीवनदाई पडीकझडीक विहिरींत, काळ्याकुट्ट अंधाराशिवाय कांहीं एक उरलेलें नाहीं ! उघड्या नागड्या दृष्टीला तळ शोधू गेला तरी सांपडणार नाहीं ! हिरव्यानिळ्या शेवाळानें, वळवळणाऱ्या सापानीं गढूळ झालेलें तिचें अंतरंग जहराप्रमाणेंच दिसत आहे ! डोळ्यांना दिसतो आहे तो एकच एक विषारी अंधार आणि अंधार ! आणि मग झपाटल्याप्रमाणें त्याच अंधारांत बुडून जावेंसें वाटूं लागतें ! भाऊसाहेब असेच स्वेच्छेनें त्या भयानक अंधारांत पुढेंपुढें शिरत चालले आहेत. मदिरेनें त्यांच्या शरिराचा पूर्ण ताबा घेतला आहे, ती मृत्यूला टिवल्याबावल्या दाखवण्यास सुरवात केली आहे ! ते बुडत चालले आहेत त्या खोल भीषण अंधारवावेंत, आणि मी त्यांना खेचून बाहेर काढून, सूर्यप्रकाश दाखविण्याचा निष्फळ प्रयत्न करतो आहे ! पोटाच्या पेशाकरतां सकाळीं गाडी भरधांव सोडत कोल्हापूर गांठतो आहे, आणि रात्रीचा थकून भागून, उसन्या अवसानानें मृत्यूशीं दोन हात करण्याकरतां, धांवपळ करत परततो आहे...

"आऽऽऽ" खोलींतल्या अंधारांतून कण्हण्याचा सूर ऐकूं येत होता. तें विव्हळणें अंतःकरणाला पिळवटून टाकणारें होतें. 'नाझू, ए नाझू, नाझू रेऽऽऽ" पाठून क्षीण हांकाही ऐकूं आल्या.

नाझू अस्वस्थ चित्तानें, माझ्या मुद्दाम धारण केलेल्या कठोर मुद्रेकडे पहायचें टाळीत, भितीला टेकून चुळबूळ करत उभा होता. त्याचे आधीच पिंजारलेले केस, तेल पाण्याच्या अभावामुळें आणि धुळीमुळें अधिकच अस्ताव्यस्त दिसत होते. डोळ्यांखालीं पडलेल्या काळ्या वर्तुळांमुळें, चेहरा भेसूर झाला होता. त्याच्या अंगावरील जीर्ण, मलीन वस्त्रांइतकेंच, त्याचें शरीरही मळकट, कळाहीन दिसत होतें ! "नाझू, नाझू रेऽऽ, आहाऽऽऽ" पुन्हां तीच क्षीण हांक, नितेंच विव्हल कण्हणें ! सबंध दिवसाच्या कामानें, आणि पेशंट लोकांचीं गाऱ्हाणीं ऐकून, माझें शरीर आणि मन दोन्हीही उबगलीं होतीं. मी अभावितपणें, समोरच्या स्टुलावर पडलेली सिगरेट केस उचलली, आणि पेटवली. केसांच्या जंजाळामुळें नाझू भूतासारखा दिसूं लागला होता मला !

"डॉक्टरसाहेब," अगदीं हलक्या दबलेल्या स्वरांत, घाबरत घाबरत तो बोलूं लागला ! त्याची छाया अंधारांत विलीन होऊं लागली.

"काय ?" मी कठोरपणें विचारलें. वाजवीपेक्षां माझा आवाज मोठा होता.

"तीन चार तास होऊन गेले, मालकांच्या जिवाची अशी तळमळ चाललीय !"

"मग ?" मनांत नसतांना आवाज चढला. मनांतल्या उसळल्या भावनांचा हलकल्लोळ, बांध फोडून बाहेर सैरावैरा धांवूं लागला होता ! गिरसप्पाच्या धबधब्यासारखे चार ओघळ करून !

"मालकांचे हाल बघवत नाहींत ! त्यांचं विव्हळणं...नेऊन देतो. त्यांना ग्लास !" उबग आल्यानें माझ्या पोटांत ढवळूं लागलें ! "चूप रहा !" मी तार स्वरांत ओरडलो. त्या भयानक शांततेच्या भिंतीवर आदळलेले माझे शब्द, खळकन फुटून, पुन्हां माझ्याच कानांत शिरले. मी अंग शहारून म्हणालों, "मालकांना मारायचं कां आहे ? खून पाडायचाय त्यांचा ? खून ?"

"खून !" नाझूनें कातरलेल्या आवाजांत शब्दांचा पुनरुच्चार केला केला त्या इमानी नोकराची मनस्थिती, डचमळलीजाऊन, माझ्या नजरेसमोर क्षणभरच हेलवली. मनांतून निराश झाला होता तो ! त्याच झटक्यानें पूर्वी एकदां मला म्हणाला होता, "डॉक्टरसाहेब, मालकांना हें सारं सहन करायला लावण्यापेक्षां, ह्या हालांतून त्यांची कायमचीच मुक्तता जर लवकर झाली, तर जन्मजन्मांतरीचे उपकार फिटणार नाहींत. उपकार फिटणार नाहीत ? कुणाचे माझे ? क्षणभरच कां होईना, माझ्या निरभ्र अंतःकरणांत सैतान शिरला होता त्यावेळीं !

"डॉक्टर साहेब !" नाझूनें पुन्हां केविलवाणी हांक मारली नी मी मनाचा निश्चय करून बाहेर पडणाऱ्या गडद अंधाराकडे पहात शांत स्वरांत म्हणालों, "चल नाझू पाणी उकळत ठेव. हायपोडर्मिकचं इन्जेक्शन देतो." नाझू मुस्कारा टाकत स्वयंपाकघराकडे वळला.

मी इन्जेक्शनची सिरिंज् घेऊन आंत गेलो तेव्हां काळाकभिन्न काळोख आ वासून गिळायला तयार होता. दिवसभर खालीं पाडलेल्या झडपांमुळेंच अंधाराला, ओतलेल्या काळ्याशार शाईचें स्वरूप आलें होतें ! मी हलक्या स्वरांत कुजबुजतांच, नाझूनें झडपा वर केल्या, आणि खुल्या हवेची थंडगार झुळूक, खोलींत खेळून अवखळपणें गुदगुल्या करूं लागली. लुकलुकणाऱ्या तारका, डोळे मिचकावत विस्मयानें पाहूं लागल्या, नी कॉटवरच्या तळमळणाऱ्या आकृतीची रेषा मनाला जाणवूं लागली ! नाझू कंदील घेऊन आंत आला, नी मी भाऊसाहेबांच्या दंडांत सुई टोचली. त्या दंडांतील पूर्वींच्या आकृ...










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

राहिला नव्हता. मी पकड सोडल्यावर, इतर अवयवांप्रमाणें तोही गलितगात्र होऊन बिछान्यावर पडला. भाऊसाहेब एकेकाळीं नांवाजलेले शिकारी होते. आपल्या पिळदार दंडाचा तोबरा त्यांनी हंसत, एकदां रगेल वाघाच्या तोंडांत देऊन, त्याला घुसमटवून, त्याची मस्ती जिरवली होती. कैक वर्षे लोटलीं त्या गोष्टीला, असें वाटतें आतां! आणि बिछाना धरण्यापूर्वीचाच तो प्रसंग. माशाच्या शिकारीला गेलों होतो मी भाऊसाहेबांबरोबर! मासे निवांतपणें त्यांच्या बंदूकीखालून पाण्याच्या पृष्ठभागावर वावरत होते. नाझू गयावया करून म्हणत होता, 'मालक तो बघा, तो बघा' भाऊसाहेबांची नजर कुठेतरी जात होती, नी गोळी कुठेतरी लगत होती. पाण्याचा फेस कांहीं रक्ताळला गेला नाहीं! नाहींतर त्यांचा नेम कधीं हुकणारा नाहीं... जीवनांतली नेमबाजीच अयशस्वी ठरलीय त्यांची आजकाल! "आहाऽऽ" सुई टोचली जातांच, भाऊसाहेब कळवळून ओरडले, आणि मी भानावर आलो. त्यांच्या हलणाऱ्या ओठांतून शब्दांना आकार येत होता. कानांनीं न ऐकतांच मी ते शब्द ओळखले. भाऊसाहेबांचा आत्मा पिळवटत होता, "डॉक्टर, दारू...दारूशिवाय कांहीं नको-नाझू—नाझूऽऽ-मासूम, मासूऽऽम!"

मी कपाळावर उभे राहिलेले टपोरे घर्मबिंदू पुसत, बाहेर व्हरांड्यांत आलो. नाझूनें कंदिलाची वात मंद केली. वैफल्याची जाणीव मनाशीं जोपासत, मी आरामखुर्चीवर शरीर झोकून दिलें! मन पिंजऱ्यांतून सुटलेल्या पांखराप्रमाणें भूतकालांत धांव घेत होतें. आठवणींच्या फांद्यांवर उडत होतें, बागडत होतें, नि अणकुचीदार कांट्यांमुळें घायाळ होत होतें. कोळिष्टकें त्याच्या पंखाला चिकटून रहात होतीं, फाटलीं जात होतीं!

नाझूनें माझ्या खुर्चीलगतच्या स्टुलावर व्हिस्कीचा ग्लास आणून ठेवला. अनवधानानेंच मी तो उचलला नि तोंडाला लावला. बर्फ न घातल्यामुळें, चिडलेल्या खरजी मनोवृत्तींवर शीतल हात फिरवून तकवा आणण्याचें सामर्थ्य त्या पेयांत नव्हतें. सोड्यांतले बुडबुडे नाहींसे होऊन, तो बेचव झाला होता. प्रकृति नि वृत्ती गरम करण्याची शक्ति, त्या व्हिस्कींत नव्हती. उष्णता आणण्याकरतां मी तो ग्लास दोन्ही पंजांत धरून चोळला आणि घोट घेतला. न पिता तो, जिभेवर घोळवला. मला तो मिळमिळीतपणा आवडला नाहीं. भराभर अर्धा ग्लास प्यायलों मी! वृत्ती कांहीं थरारल्या नाहींत, पण ठसका मात्र लागला! सिगरेटचा जबरदस्त झुरका मारला, आणि नाकांतून ऊष्ण, भाजणारा धूर बाहेर सोडला. पुन्हां एकवार नाझूला हांक मारून बीअर फोडविली, आणि व्हिस्कींत मिसळून दिली.

दूरवर क्षितिजावर कोल्हापूरचे दिवे मिणमिणत होते. रसरसणाऱ्या जीवनाची साक्ष ती! आणि मी इथें बसलोय् मृत्यूला सोबत करत! मृत्यूला डावपेच टाकून हरवण्याची जीद्द करत! मासूमची अमूल्य ठेव जिवापलिकडे संभाळत!

आणि भाऊसाहेब! जीवाला जीव देणाऱ्या प्रेयसीला, जिगरदोस्ताला, आणि इमानी नोकराला, कुणालाही ओळखण्याच्या मनःस्थितींत नाहींत ते सध्यां! ओळख विसरण्याकरतां, आठवणींचे जिव्हारी घाव बुझवून टाकण्याकरतांच त्यानीं त्या खोल अंधाऱ्या गर्तेत स्वतःस लोटून दिलें आहे ना?..

कंदिलाच्या उजेडांत, नाझूची सावली भूतासारखी स्वयंपाकघराच्या भिंतीवर नाचत आहे. थोड्यावेळानें तो येऊन, मला खाना आणूं काय, म्हणून विचारेल. मी मानेनेंच नकार देईन, आणि ग्लासाकडे बोट दाखवीन. अन्नावर माझी वांछाच नाहीं. जीभेची चव कडवट झाली आहे. उन्माद चढावा असें वाटतें! भाऊसाहेबांच्या बाबतींत वीष ठरलेली मदिरा, सध्यां मला अमृत वाटते आहे! चहुंकडे अंधार भरून उरला आहे; शांतता, स्मशानभूमीची आठवण करून देत आहे! मध्येंच एक न दिसणारें कुत्रें, विलक्षण अभद्ररितीनें केकाटतें आणि, शरिरावर कांटे उमटतात! आणि मध्येंच कानांना नुपूराचे रुणझुणरूणझुण झंकार ऐकूं येतात आणि तबल्यावर थाप पडते! ग्लासाच्या कडेवर आदळणाऱ्या बर्फाच्या खड्याची मधूर किणकिण मनाला मोह पाडूं लागते. मी हातांतल्या कोमट पेयाचा एक घोट घेतो...

डॉक्टरीचा पेशा माझा! माझा धंदा जोरांत चालू होता, आणि धंद्यामुळेंच माझी श्रीमंत भाऊसाहेबांशीं गांठ पडली. आतांपर्यंत माझी अनेक श्रीमंतांशीं गांठ पडली होती, आणि ऐश्वर्याचें वाटणारें नवल, कधींच आटोपलें होतें. भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वानें त्यांच्या गोड व दिलदार स्वभावामुळेंच मी त्यांच्याकडे आकर्षित झालों असें म्हणावयास हरकत नाहीं! श्रीमंतांच्या नादीपणाचा, संस्थानीं नादानपणाचा लहरींचा नी एकंदर पोरकट मूर्खपणाचा मला चांगलाच अनुभव असल्यामुळें, मी कांहीं भाऊसाहेबांशी मैत्री जोडायला गेलों नाहीं. संस्थानी कारभार असल्यामुळें मी जपून वागत होतों. दोस्ती जमवण्याचा नी ती टिकवण्याचा प्रयत्न केला भाऊसाहेबांनींच! आणि नकळतच मी त्यांचा एक विश्वासू जिगरदोस्त बनलों. त्यांच्या व्यक्तिमत्वानें माझ्या साऱ्या शंकाकुशंका खोडून काढल्या!

महाराष्ट्रांतील, विचारवंत, बुद्धिवंत, श्रद्धावंत, प्रज्ञावंत
यांना आवाहन करणारी एक अभिनव लेखमाला!

**कुंजरो छब्बीसाणों!**
**दृष्ट्वा तु पांडवानीकम्!**

लेखक : चित्रकार **द. ग. गोडसे**
दीपावलींतून लवकरच प्रसिद्ध होत आहे.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

भाऊसाहेब होते एक सामान्य इनामदारच. असामान्यपणा होता त्यांच्या गोड दिलदार रंगिल्या स्वभावांत ! रंगेल जीवनांत, नी रुबाबदार व्यक्तिमत्वात ! रयतेच्या उपयोगी पडतील, पण त्यांच्या बरोबरीनें लाचार कधींच होणार नाहींत ! उलट राजाच्या दिमाखानें मिरवीत त्याच राजाच्या ऐटीनें सढळ हातानें दानही करत ! त्यांचे त्यावेळचे लोक त्यांना देवाप्रमाणें मानत, कारण पाठ उघडी करून फोडून काढणारा हात, पोटावर घड्याही घालण्यास तयार असे.

गुळाभोंवतीं मुंगळे जमतात त्याप्रमाणें भाऊसाहेबांच्या भोंवती रंगिले शोकिन लोक जमले होते ! बेदरकारपणें भाऊसाहे जीवनाच्या आनंदाचा मनसोक्त उपभोग घेत होते, इतरांना लुटू देत होते ! सहज लहर म्हणून माझ्यासारख्याशीं मैत्रीचें नातें त्यांनीं जोडलें, तें इतकें जिव्हाळयाचें ठरेल असे कधींच वाटलें नव्हते ! कालानें आज तें नातें, रक्ताच्या नात्यापेक्षांही श्रेष्ठ ठरवलें आहे.

त्यावेळीं सौख्याच्या अत्युच शिखरावर भाऊसाहेब विराजमान झाले होते. वर बसलेला माणूस, छोट्या दिसणाऱ्या जागाकडे ज्या दिलदार नजरेनें पहातो, त्याच भावानें भाऊसाहेब इतरांना कवटाळीत होते. आणि म्हणूनच भाऊसाहेबांनीं लाघवीपणानें आमच्यांतली मैत्री दृढ केली, नाहींतर मी मुळांत अलिप्तच राहिलो होतो. मला त्यानीं आपला फॅमिली डॉक्टरसुद्धां बनवलें, आणि माझी त्यांच्या घरांत, अंतर्गृहापर्यंत जा ये सुरू झाली !

भाऊसाहेबांचें घराणें खानदानी होतें, त्यामुळें त्यांची पत्नी कधीं विशेष बाहेर दिसत नसे. तशांत संस्थानांतली रहाणी ! अशा तऱ्हेच्या जीवनामुळें बनणारा कडवट आणि तक्रारी स्वभाव, भाऊसाहेबांच्या पत्नीचाही बनला होता ! भाऊसाहेबांना ह्या जगांत कसलीही काळजी नव्हती ! त्यांच्या मुलाबाळांच्या प्रकृतीचा जिम्मेदार मी होतो. त्यांच्या मार्गे कसलीही उपाधी नव्हती. अखेरची उपाधी लागली ती, ती प्राणाहून प्रियतम अशा मासूमची ! आणि त्या नाजूक सुंदर उपाधीमुळेंच त्यांचे दुर्दैव ओढवलें !

भाऊसाहेबांच्या कणखर देहांत पुरुषी देखणेपणा आणि आकर्षकता होती. निर्ढावलेल्या छातीनें ते जेव्हां बाघापुढें टाकत, तेव्हां त्याचा नूर कांहीं औरच असे ! तर त्यांच्या रंगिल्या वृत्तीची लहर कांहीं वेगळीच असे ! त्यांत घाबरट मित्रेपणा, अगर संकोच कधींच नसे. धुंद करणारें प्रेम करण्यांत नी करवून घेण्यांत त्यांचा हातखंडा होता !

कित्येक रात्रीं, ह्या पन्हाळयाच्या बंगल्यांत दिव्यांच्या झुंबरांना लखलखाट झालेला असे. चुलीवर शिजणाऱ्या कोंबडी बिरयानीचा नी परसुंधांचा दरवळलेला सुवास, अत्तर अगरबत्तीच्या सुवासांत मिसळलेला असे ! मदिरेची मस्त बेहोष धुंदी चढलेली असे. कोल्हापुराहून आणलेल्या गायिका नर्तकींच्या ताफ्यांत, नर्मविनोदाचे कर्णमधुर सूर, हास्याच्या नाजूक कलकलाटांत मिसळत असत. संगीताच्या हवेवर फेकलेल्या लकेरीवर लकेरीमुळें, पैंजणांच्या तुफानी रुणझुणीमुळें, मन पागल बनून जाऊन आख्खा पन्हाळा त्या नादलहरींनीं दुमदुमत असे. पैशाखातर आलेल्या वारयोषिता, भाऊसाहेबांवरून जीव कुर्बान करून टाकत नि प्राण पणाला लावून आपली कला ओसंडत ! आदा करण्यापायीं पैशांचा खुर्दा होई ! रुपयांच्या नोटा हवेंत उडत आणि त्यांचा खच पडे ! आज इथलें हें सामानसुमान जीर्ण झालें असेल, परंतु त्यावेळीं नव्याची नवी झिलई होती ! आणि चढलेल्या धुंदीचा कोथ फोडून, कधीं मध्यरात्रीही लहर लागली तर भाऊसाहेब आपली बारा बोअर, नाहीं तर मॅनलिकर त्यांच्यावर टाकत, नि मोटरींत बसून खुशाल पन्हाळा उतरून जात ! रत्नागिरीच्या आंबेघाटापर्यंत, नि मलकापूर–विशाळगडापर्यंत मोटर पल्ला मारून यायची आणि तांबडें फुटायच्या वेळीं परत आलेल्या त्या मोटरींच्या बॉनेटवर हमखास, विचक्या वाघाचे धूड असे ! तो जमाना कांहीं आगळाच होता ! पैसा, सत्ता, कला, सौन्दर्य, मदिरा आणि शौर्य ह्या पुरुषाच्या पुरुषार्थाला शोभा देणाऱ्या सहाही गोष्टी भाऊसाहेबांच्या पुढें हात जोडून उभ्या होत्या ! आणि त्यांना तो गुलामाप्रमाणें राबवून घेत होते !

त्या छंदीफंदी काळांतच भाऊसाहेबांशीं– मासूमशीं ओळख झाली आणि दैवाचे फांसे उलटले. मासूम पांढऱ्या पायांची ठरली.

कधीं लहरीखातर इनामगांवाहून भाऊसाहेब बाहेर पडत नी परगांवीं फेरफटका करण्यास जात ! त्यांची नातेवाईक मंडळी ह्या बाजूला बडोद्याकडे, आणि त्या बाजूला इंदूर-ग्वाल्हेरकडे पसरली होतीं. ह्यावेळचा त्यांचा मुक्काम बराच लांबला. परत आले ते परस्पर पन्हाळ्याला चालते झाले असें कळलें. आणि

( पान ४४ वर )





भरतकाम व विणकाम करण्यासाठीं महिला नेहमींच सप्तरंगी छटा असलेल्या

जी. सी.
विमान छाप

कापसाच्या सुताच्या लडी तसेंच पक्क्या रंगाचे विविध रंगी सूत (बॉल्स) पसंत करतात.

जी. सी. विमान छापाच्या सुताच्या लडी व सुत ( बॉल्स ) सर्वत्र मिळतात. अधिक माहितीसाठीं लिहा अगर भेटा

BOMBAY THREAD BALL Mfg. Co.
6, DADI SANTOK LANE (DHOBI TALAO),
BOMBAY 2.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




# म★द★न★रे★खा

बारा कोसावर भाषा बदलते म्हणतात ! भारतांतल्या अशा प्रत्येक भाषेंत शेंकडों लोककथा प्रचलित आहेत. दक्षिण भारतांत तर अशी एकेक कथा ऐकतां ऐकतां रात्र संपते; पण कथा संपत नाहीं. अशीच ही एक तेलगु लोककथा...

पूर्वीं मगधदेशांत कनकेश्वर नांवाचा एक राजा राज्य करीत होता. हा राजा प्रजापालनांत अत्यंत दक्ष असून, परम न्यायी आणि दयाळू होता. जसा बलाढ्य तसाच तो पराक्रमीहि होता. त्यामुळें शत्रु त्याला चळचळां कांपत असे. प्रजेचें हित तेंच आपलें हित, प्रजेचा आनंद तोच आपला आनंद आणि प्रजेचीं दुःखें तीं आपलीं दुःखें असें त्याचें वागणें होतें. उत्तम अश्वपरीक्षक म्हणूनहि त्याचा लौकीक होता. सकलगुणालंकृत, प्रजावत्सल अशा त्या राजाला एकच दुःख सलत होतें, तें म्हणजे अजूनपर्यंत राजाला संतान झालेलें नव्हतें. राज्यकारभारांत मन गुंतवून राजा क्षणभर तरी त्या दुःखाच्या विचारांपासून दूर जाऊं शकत होता; परंतु राणी रत्नमाला मात्र या विचारानें खंगत चालली होती. अखेर राजा कनकेश्वरानें राजपुरोहिताच्या सल्ल्यानें देशो-देशींचे महान भविष्यवेत्ते आणि विद्वान पंडितांना बोलवून विचार-विनिमय केला. त्यांच्या त्या विनिमयांतून एकच निर्णय घेतला गेला. आणि तो म्हणजे राजाने पुत्रकामेष्टी यज्ञ करावा.

सर्व गोष्टींची सिद्धता करून राजानें यज्ञ केला व यज्ञदेवता प्रसन्न होऊन तिनें राजाला दोन अपत्यें दिलीं. दिव्य अशी एक कन्या आणि एक पुत्र. अत्यंत लावण्यवती अशा त्या कन्येचें नांव, राजानें मदनरेखा ठेवलें आणि पुत्राचें नांव ठेवलें प्रताप ! कन्या व पुत्र यानां वाढत्या वयाप्रमाणें योग्य असें शिक्षण देऊन, इतर प्रजा-जनांतहि त्यांना मिसळतां यावें म्हणून; वयाच्या आठव्या वर्षी राजकन्या मदनरेखा व राजपुत्र प्रताप यांना उच्च विद्याध्ययन करण्याकरितां मांधाता नांवाच्या गुरूच्या आश्रमांत पाठवून दिलें. आणि इतर प्रजाजनांच्या मुलांबरोबर मदनरेखा व प्रताप या दोघांच्या गुणांचा विकास होऊं लागला.

अशींच कांहीं वर्षे गेलीं आणि गुरुगृहांतलीं तीं मुलें पौगंडा-वस्थेंतून तारुण्यांत पदार्पण करूं लागलीं. गुरु मांधातांना चंडी नांवाचा एक मुलगा होता. मदनरेखेपेक्षां तो ४ वर्षांनीं मोठाच होता. त्या मुलाचें अध्ययनहि याच मुलांबरोबर झालें. चंडी मोठा हुशार होता. हजरजबाबीपणा हा त्याचा फार मोठा गूण. या






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गुणामुळें वर्गातल्या सर्व मुलांना तो अतिशय प्रिय वाटे. शिवाय अभ्यासांत तो सदाच वरच्या क्रमांकांत असायचा. मदनरेखेला चंडी खूप आवडे. त्याच्याशिवाय क्षणभरहि तिला चैन पडत नसे. त्यामुळें राजगृहांत देखील त्याच्याबद्दल विशेष आस्था बाळगली जाऊं लागली. पुढें अध्ययन संपलें, तशीं सर्व मुलें आपापल्या घरीं गेलीं.

मदनरेखा आतां वयांत आली होती. तिच्या वरसंशोधनांत राजा गर्क होता. शुक्लेंदुवत वाढणाऱ्या तिच्या सौन्दर्याची कीर्ति देशोदेशीं पसरली होती. कधीं ती नृत्यगायनांत मग्न असे, कधीं सख्यांबरोबर, तर कधीं एकटी अशी उद्यानांत विहार करी, कधीं एखाद्या सूर्यविकासी कमळांनीं भरलेल्या तळ्याच्या कांठीं बसून, चित्र-रेखनांत मग्न असे.

अशीच एकदां, एकटीच मृगशावकांशीं खेळत खेळत, ती राजप्रासादांतल्या उद्यानापासून बऱ्याच अंतरावर असलेल्या केळीच्या बनांत आली. तिथलीं तीं फलभारांनीं लवलेलीं केळीचीं झाडें, मधूनच विखूरलेलीं ऊंचचऊंच पोफळीचीं झाडें, त्यांमधून झुळू झुळू वाहणारे पाण्याचे पाट आणि भुर ऽऽ भुर ऽऽ अशा गिरक्या घेत चिवचिवाट करणारीं रंगी बेरंगी पांखरें पाहून तिचें मन उल्हसित झालें. किती वेळ तरी तें दृश्य पाहात ती उभी होती. कुणीतरी तिच्या नांवानें हांक मारली " मदनरेखे "

तिनें मार्गे वळून पाहिलें, मातीच्या एका उंचवट्यावर चंडी उभा होता. कित्येक दिवसांनीं ती चंडीला पाहात होती. प्रथम ती त्याला ओळखायला विसरली. तो एखाद्या देवदूतासारखाच तिला वाटला. त्याची ती पिळदार आणि लोभसवाणी अंगयष्टी, मानेवर रुळणारे कुरळे कुरळे केस, सभा-पांडित्य गाजवून सालंकृत झालेलें शरीर, तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. प्रथम ती लाजल्यासारखी झाली. तिनें ढळलेला पदर सांवरला; परंतु त्याची ओळख पटल्यामुळें लगेच त्याला हांक मारीत ती म्हणाली,

" अगबाई चंडी का ? मीं ओळखायेलाच विसरलें ! किती बदल झालाय रे तुझ्यांत ! "

" आणि तुझ्यांत देखील तो अपार झालेला आहे. मला वाटलं एखादी यक्षकन्या, गंधर्वकन्या किंवा देवकन्या इथें विहरत असावी. क्षणभर माझ्याहि डोळ्यांवर माझा विश्वास बसेना; पण नंतर ओळखलं ! इतका वेळ काय पहात होतीस ? "

" कांहीं नाहीं रे सहज फिरत फिरत आलें. आणि थकवा आला म्हणून थोडा वेळ या झुळझुळ वाहणाऱ्या पाटाच्या पाण्याकडे पाहात उभी राहिलें. किती शांत वाटतं नाहीं, या वाहात्या पाण्याकडे पाहात राहिल्यानें ? "

मातीच्या त्या उंचवट्यावरून खालीं उतरत चंडी, मदनरेखेच्या अधिक जवळ आला. गेलीं कित्येक वर्षें तो मदनरेखेला भेटूं शकला नव्हता. त्यानें अध्ययन संपवलें आणि अध्यापनांत कांहीं दिवस घालवून आपली विद्वत्ता आजमावण्याकरितां तो घराबाहेर पडला. त्यानंतर आपल्या पांडित्यानें विद्वज्जनांच्या अनेक सभा जिंकत पारितोषिकें मिळवत कीर्तिवंत होऊन तो परत आला होता. पौगंडावस्थेंत मदनरेखेला तो आवडे याचें कारण तो एक हुशार विद्यार्थी

( पान ४३ वर चालू )

## मूर्ति लहान .. कीर्ति थोर

# क्लोरोफॉर्मचा जनक

दीडशें वर्षांपूर्वी शस्त्रक्रिया म्हटली कीं रुग्णाला रडूं कोसळायचं. त्यावेळीं रुग्णाचं सारं शरीर रस्सीनें गच्च बांधण्यांत येत असे. त्याचं ओरडणं ऐकून डॉक्टरचं पण मन बेचैन होत असे—त्यांचे हात व्यवस्थितं काम करीत नसत. सारं शरीर घामानें डबडबून जाई. बहुतेक रोगी रोगापेक्षां ह्या उपचारांनीच इहलोक सोडून परलोकचा रस्ता सुधारीत.

इ. स. १८२९ मध्यें एडिंबरोमधील एका उच्च प्रतीच्या हॉस्पिटलमध्यें एक शस्त्रक्रिया चालू होती. रुग्णाची व शस्त्रवैद्याची पण शोचनीय अवस्था पाहून एका अठरा वर्षांच्या वैद्यकीय शिक्षण घेणाऱ्या तरुणास मूर्च्छा आली. आणि त्याचवेळीं चिडलेल्या त्या तरुणानें प्रतिज्ञा केली कीं आपलं वैद्यकीय शिक्षण संपतांच आपण आपलं उर्वरीत आयुष्य ऑपरेशन टेबलावरील रुग्णाचे हाल कमी कसे करतां येतील ह्या विषयाला वहाणार.

आणि त्यानं तसं केलंहि. जवळजवळ पंधरा वर्षे अविश्रांत परिश्रम करून त्याला एक साधन मिळालं. त्या साधनामुळें केवळ वैद्यकीय जगांतच नव्हे तर अखिल मानवजातींत त्याची वाहवा झाली.

४ नोव्हेंबर १८४७ हा तो भाग्याचा दिवस. याच दिवशीं आपल्या चरित्र नायकानें क्लोरोफॉर्मचा शोध लावला.

आपल्या चरित्र नायकाचं नांव आहे जेम्स यंग सिम्पसन.

एडिंबरोपासून वीस मैल दूर असलेल्या एका खेड्यांत त्याचा जन्म ७ जून १८११ रोजीं झाला. सिम्पसनच्या बापाचं पावरोटीचं एक छोटंसं दुकान होतं. त्यांतून त्याचा चरितार्थ कसाबसा चाले. साहजीकच जेम्सच्या जन्मानें शेजाऱ्या पाजाऱ्यांना सुखाऐवजीं दुःख झालं. सात मुलांत आणखी एक खाणाऱ्या तोंडाची भर.

थोडासा मोठा होतांच जेम्स शाळेंत जाऊं लागला. त्याची असामान्य बुद्धिमत्ता पाहून हेडमास्तर खुष झाले व त्यांनीं त्याला सर्व तऱ्हेची मदत करावयास सुरवात केली. चौदाव्या वर्षी जेम्स सिम्पसन शाळेंतील शेवटची परीक्षा मानानें पास झाला आणि तो एडिंबरो विश्वविद्यालयांत दाखल झाला.

दोन वर्षांनंतर म्हणजे सोळाव्या वर्षी त्यानं वैद्यकीय शिक्षण घेण्यास सुरवात केली आणि त्यानंतर थोड्याच दिवसांनीं वर वर्णन केलेली घटना घडली.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

वैद्यकीय शिक्षण घेण्याची इच्छासुद्धां त्याला लोकांची गैरसोय दूर करण्यासाठींच झाली. त्याच्या गांवीं महामारीची साथ सुरू झाली होती व लोक औषधोपचाराअभावी पटापट मरत होते. त्याला तें पाहवेना. आणि लोकांचे हाल अंशतः तरी दूर करावेत म्हणून त्यानें वैद्यकीय पेशा पत्करला.

वैद्यकीय परिक्षेंत तो सन्मानानें पास झाला व एडिंबरोमध्यें त्यानें आपली प्रॅक्टीस करण्यास सुरवात केली. थोड्याच दिवसांत एक कुशल चिकित्सक आणि रुग्णांविषयीं दया-प्रेम असलेला वैद्य अशी त्याची ख्याती जिकडे तिकडे झाली.

त्याच सुमारास एडिंबरोचे विख्यात चिकित्सक-अध्यापक डॉ० हॅमिल्टन यानीं आपल्या जागेचा राजिनामा दिला. तेव्हां आपल्या हितचिंतकांच्या सांगण्यावरून डॉ० सिम्पसननें त्या जागेसाठीं अर्ज केला. अधिकारी वर्गाला डॉ० सिम्पसनच्या अलौकिक बुद्धिमत्तेची जाणीव होतीच. त्यांनी सिम्पसनची निवड एकमेतानें केली. पण त्याच्या मार्गांत अजून एक मोठी अडचण होती. ती जागा कुणाहि अविवाहित डॉक्टरला द्यावयाची नाहीं असा एक नियम होता. तेव्हां सिम्पसननें आपली मैत्रीण जेसी ग्रिंडल हिला एक पत्र लिहिलं व तिला सर्व इतिहास कळवून शेवटीं लिहिलं " माझ्या प्रार्थना पत्रावर केवळ सही करून भागणार नाहीं. तुला स्वतःला इथं यावं लागेल आणि तुझे दोन हात माझ्या हातांत मिळवून आपणांस चतुर्भूज व्हावं लागेल. " आणि जेसीनें सिम्पसनची विनंति मान्य केली आणि लौकरच त्यांचं लग्न झालं.

थोड्याच दिवसांत उत्कृष्ट चिकित्सक व उत्कृष्ट सर्जन म्हणून सिम्पसनची युरपभर ख्याती झाली. मात्र तरीहि डॉ० सिम्पसनचं मन सुखी नव्हतं. ऑपरेशनच्या वेळचे रोग्यांचे हाल त्याला पहावत नसत. त्याच सुमारास अमेरिकेंत ईथरचं संशोधन झालं. सर्व डॉक्टरनां ईथरनें मोहीत केलं. डॉ० सिम्पसनचं कुतुहल जागृत झालं. पण प्रात्यक्षिक पाहिल्यावर त्याची खात्री झाली कीं ईथरनं सर्जरीला फारसा हातभार लावला नाहीं. ईथर येण्यापूर्वीं जिथं आपण होतों तिथंच अद्याप आहोंत. सिम्पसनला नव्या शोधाची आवश्यकता तीव्रतेनें पटली होती व दिवसा हॉस्पीटल्स व विद्यालयांतील कामं करून रात्रौ तो आपल्या संशोधनाच्या मागें लागे. त्याच्या संशोधन कार्यात त्याला डॉ. किथ व डॉ. डंकन यांचं सहाय्य होई.

खाण्यापिण्याची पर्वा न करतां सिम्पसन आपल्या संशोधनकार्यांत मग्न राही. आशानिराशेच्या दोलायमान परिस्थितींत दिवस जात होते.


'दीपावली"

**वर्गणीदारांस सूचना :—**

या अंकापासून ज्यांची वार्षिक वर्गणी संपते त्यांनी पुढील वर्षाची वर्गणी (रु. १२-५० न. पैसे) १५ तारखेपर्यंत आम्हांस मिळेल अशी पाठविण्याची कृपया व्यवस्था करावी. व्ही. पी. पद्धत नसल्यामुळें ज्यांची वर्गणी जमा झाली नसेल त्यांना पुढील अंक पाठवितां येणार नाहीं.

व्यवस्थापक, **दीपावली**


आणि एके दिवशीं एक चमत्कार घडला. सिम्पसननें एका बाटलीं-तील द्रवाचा वास घेतला व रागानें ती बाटली जमिनीवर फेकली. त्याचवेळीं त्याचा सहकारी डॉ. कीथ दुसऱ्या एका बाटलींतील द्रवाचा वास घेतांना हळूहळू बेशुद्ध पडतांना त्यानीं पाहिला. डॉ. सिम्पसनच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. लागोलाग डॉ. सिम्पसन आणि डॉ. डंकन या दोघांनीहि त्या बाटलीचा वास घेतला व त्यांचीहि अवस्था पहिल्या डॉक्टरसारखीच झाली. ते तिघेहि जमिनीवर बेशुद्ध पडले होते.

थोड्याच वेळानं डॉ. सिम्पसनची बायको व बहीण त्या तिघांना जेवायला बोलावण्यासाठीं आली आणि पाहतात तों तिघेहि 'वेडे' डॉ. जमिनीवर अस्ताव्यस्त पडले आहेत. हें पाहतांच त्या दोघीहि घाबरल्या. निराशेने त्यानीं आत्महत्या तर केली नसेल ना ! त्यानां शंका आली; आणि त्यानीं त्यांची नाडी पाहिली, तेव्हां त्यांचा जीव भांड्यांत पडला. तिघांच्याहि नाड्या संथपणें चालू होत्या. त्यांनीं त्यानां शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला.

थोड्याशा परिश्रमानंतर डॉ. सिम्पसननें डोळे उघडले. त्याच्या पत्नीनें त्याला विचारलं " कशी आहे प्रकृती ! " तेव्हां आनंदातिशयानें सिम्पसन म्हणाला " जेसी मी जिंकलों. आतां ऑपरेशनच्या टेबलावरील पेशंटचे हाल खतम. "

आणि अशा तऱ्हेने सिम्पसन आणि त्याचे सहकारी यांनीं ४-११-१८४७ रोजीं क्लोराफॉर्मचा शोध लावला.

क्लोरोफॉर्मचा शोध लागला आणि सिम्पसन ह्याचा यशस्वी रित्या उपयोग करूं लागला. परंतु धर्माधिकारी पादरीनी त्याला विरोध करावयास सुरवात केली. त्यांचं म्हणणं असं कीं " ईश्वराच्या इच्छे विरूद्ध जर मनुष्याने काम केलं तर त्यामुळें ईश्वरचा कोप होईल. " आणि ईश्वराच्या तथाकथित क्रोधाची लोकानां इतकी भीतिं वाटली कीं लोक स्वतःच क्लोरोफॉर्म वापरण्याच्या विरूध्द होऊं लागले. पण एकदां महाराणी व्हिक्टोरियाचं ऑपरेशन होत आणि तिनं जेव्हां खुषीनं क्लोरोफॉर्म घेतला तेव्हां त्याच पाद्रयानीं दुसरा फतवा काढला कीं

" आतां क्लोरोफॉर्म वापरणं हे इच्छे विरुध्द नाहीं ! "

डॉ० सिम्पसन अतिशय कर्तव्यदक्ष होता, एकदां आपरेशन चालू असतां एक स्त्री तिथं आली व नोकराला म्हणाली कीं, "मला आत्तांच्या आत्तां डॉ० सिम्पसनना भेटायचं आहे. तेव्हां नोकरांने सांगितलं कीं, डॉक्टर ऑपरेशनच्या कामांत मग्न आहेत व ते तेव्हां कोणास भेटूं शकणार नाहीं. तेव्हां तिनं आपलं व्हिजिटिंग कार्ड त्याच्याकडे देऊन सांगितलं कीं हें कार्ड डॉक्टरना नेऊन दे व पहा कसे झटपट बाहेर येतात ते.

ती स्त्री म्हणते इंग्लंडमधील एक बडं प्रस्थ होतं व तिचे हात महाराणी व्हिक्टोरिया राणीपर्यंत पोचत होते.

पण डॉ० सिम्पसन बाहेर आले नाहींत. ऑपरेशन संपल्यावर बाहेर आले व त्या माननीय महिलेस म्हणाले, " बाईसाहेब ऑपरेशन चालू असतांना मीं बाहेर येऊं शकत नाहीं. तुमच्याऐवजीं महाराणी व्हिक्टोरिया बाहेर उभी असती तरी मी असाच वागलों असतों. "

• • •





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

( पान ४१ वरून )

हेंच होतें; पण त्याच्याबद्दल याहून अधिक कुठलीच भावना तिच्या मनांत नव्हती. याच्या उलट चंडीच्या मनांत स्त्री पुरुषांतील भेद कळूं लागल्यापासून--राजकन्येबद्दल प्रेमाची भावना रुजूं घातली होती. जसजसा तो वयानें वाढत होता त्या प्रेमभावनेच्या वृक्षानें आपला विस्तार वाढवला होता. आणि ही गोष्ट आपणाला अप्राप्य आहे, ती मिळणें कालत्रयीं शक्य नाहीं, ती राजकन्या आपण गरीब ब्राह्मणपुत्र, तिचा आपला कधीं संबंध येणें शक्य आहे काय ? वगैरे बिचारांनें चंडी जेव्हां विषण्ण होई, तेव्हां त्याचें मस्तक भडकून उठे; परंतु मदनरेखेबद्दलचा बळावलेला विचार कशाच रीतीनें मनांतून तो काढून टाकूं शकला नाहीं; पण आज एकाएकीं एक संधी आली होती, आणि त्या संधीचा समयसूचकतेनें चंडी फायदा घेणार होता. राजकन्येचे ते शब्द ऐकून मुख्य मुद्यालाच हात घालायच्या उद्देशानें तो म्हणाला,

“ हो, पण अंतःकरणांत पेटलेला दाह या असल्या पाटाच्या पाण्याकडे पाहात राहिल्यानें शांत होणार नाहीं. पाटाच्याच कां ? ओढ्याच्या, नाल्याच्या, नदीच्या वा समुद्राच्या पाण्याच्या सिंचनांनेहि तो शांत होणार नाहीं ! ”

“ म्हणजे मी नाहीं समजलें तुझ्या म्हणण्याचा अर्थ ! ”

“ तुला त्याचा अर्थ कधींच कळणार नाहीं. कारण समस्या मींच मला घातलेली आहे. मींच ती रचलेली आहे आणि त्याचा अर्थहि मलाच माहिती आहे ! ”

बोलतां बोलतां चंडी गंभीर होऊं लागला त्याचे डोळे भरून आले. भरल्याडोळ्यानीं एकटक मदनरेखेच्या मुखाकडे तो पाहूं लागला. “ चंडी तुझ्या समस्येचा अर्थ मला कळला नाहीं, हें मीं कबूल करतें; परंतु तुझ्या या भरलेल्या डोळ्यांकडे पाहून वाटतं, कीं कसली तरी व्यथा तुला ग्रासत असावी, कसलं तरी शल्य सलत असावं. त्याचं कारण जर तूं मला सांगशील, तर तुझं दुःख कमी करण्याकरितां मी शक्य ते प्रयत्न करीन ! ”

“ पण माझ्या दुःखाचं खरं कारण—मदनरेखे-तूंच आहेस, असं जर मी तुला सांगितलं तर तुला आश्चर्य वाटेल काय ? ” आणि इतकें बोलून जवळ येऊन एकदम तिचा हात धरून हृदयाशीं लावीत तो म्हणाला.

“ मदनरेखे—”

घडत असलेल्या प्रकारानें मदनरेखा स्तंभीत झाली. बावरली; पण लगेच तिनें स्वतःला सांवरलें. त्याच्या हातांत असलेला आपला हात झटकून सोडवून घेत ती म्हणाली—

“ चंडी, आवर स्वतःला ! आपण काय बोलत आहों, कुणाशीं बोलत आहों, याची तुला जाणीव आहे काय ? आपण कोणतं वर्तन कुणाशीं करीत आहों याची तुला शुद्ध आहे काय ? ”

“ नाहीं, मदनरेखे नाहीं. ” माझी शुद्धबुद्ध सर्व कांहीं हरपलेलं आहे ! तुझ्या प्राप्तीच्या अभिलाषेशिवाय मला दुसरी कसलीच इच्छा नाहीं. मदनरेखे, प्रेमाच्या राज्यांत विहार करूं लागलेल्या माणसाला, शुद्ध-बुद्ध, जाणिवा-नेणिवा याचा लेश राहात नाहीं. प्रेमाची धुंदी मद्याच्या धुंदीपेक्षांहि अधिक कैफ चढवते ! ” इतकें बोलून त्यानें मदनरेखेचे दोन्ही हात धरून तिला जवळ ओढली आणि आपल्या पुष्ट छातीवर तिला घेत आवळून धरून तिच्या ओठांना आपल्या ओठांनीं तो स्पर्श करणार इतक्यांत विजेसारखा एक धक्का मारून मदनरेखा त्याच्या विळख्यांतून सुटली. तिच्या अंगांत पिसाळलेल्या वाघिणीचें बळ आलें होतें. तिच्या डोळ्यांतून जणूं अग्निस्फुल्लींग बाहेर पडत होते. आणि मुखावाटे जळजळीत शब्दांचे अंगार.

“मूर्ख चंडी. तूं हें काय करतो आहेस ? मी आतां मोठ्यानें ओरडलें तर राजसेवक धांवत येतील आणि तुझ्या या वर्तनाबद्दल राजापाशीं नेलें तर तुला राजदंडास पात्र व्हावें लागेल, अरे तूं माझा गुरुबंधू आणि असं नियमबाह्य वर्तन करतांना तुझ्या मनाला कांहींच कसं वाटलं नाहीं ? कुणी हें पाहिलं किंवा ऐकलं तर जग काय म्हणेल ? लोक काय बोलतील ? समाज काय म्हणेल ? तूं ब्राह्मण कुळांत जन्म घेतलेला आहेस, बुद्धिमान आहेस ! माझ्याशीं लग्न करायची तुझी इच्छा असली, तर त्याला वेगळे मार्ग नाहींत कां ? त्यासाठीं तूं माझ्या वडिलांजवळ जाऊन मला रीतसर मागणी घालूं शकणार नाहींस काय ? तुझा अधिकार मी अमान्य करीत नाहीं;- परंतु असं हें वर्तन अधःपाताला कारणीभूत नाहीं का होत ? मग कुस्करल्या गेलेल्या, दुसऱ्यानं हुंगलेल्या फुलाचा कुणी स्वीकार करील काय ?

“ राजकन्ये, मला हें तत्वज्ञान कळत नाहीं, असं तूं समजूं नकोस ! किंबहुना त्याहूनहि अधिक मी तुला सांगूं शकेन; पण त्या तत्वज्ञानाचा आतां या क्षणीं मजवर कोणताहि परिणाम होणार नाहीं. एकाच गुरुगृहीं राहिल्यानें भगिनीचं नातं सांगून, परंपरागत नीतिमत्तेचं भय तूं मला घालूं नकोस. उदाहरणच पाहिजे असेल तर सांगतों. सर्व तारामंडळांत दीप्तिमान असलेल्या चंद्रानें गुरुपत्नीशीं तारेशीं संबंध ठेवतांना हा विचार केला नाहीं ! देवेंद्रानें अहिल्येची अभिलाषा धरून तिचा उपभोग घेतांना हा विचार केला नाहीं ! पराशरानें मत्स्यगंधेच्या बाबतींत हा विचार केला नाहीं. असे एक ना दोन, कित्येक दाखले मी तुला देऊं शकेन, पण त्याच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. माझं तुझ्यावर अपरंपार प्रेम आहे. आज कित्येक वर्षें मीं तुझ्या प्राप्तीची इच्छा धरली. मी विस्तवाशीं खेळत होतों, याची जाणीव होती मला, पण मला उमज पडलाच नाहीं. पतंगासारखा तुझ्या प्रीतीच्या ज्योतीवर मीं जळून गेलों, तरी मला पर्वा नाहीं, मदनरेखे तूं राजकन्या आहेस, मीं ब्राह्मणपुत्र. तुझी माझी जोडी कधींच जमणार नाहीं हें मला समजतं; पण आतां आलेली ही संधी मी सोडणार नाहीं. तुझ्या प्रेमप्राप्तीसाठीं मनोमन केलेल्या आराधनेचं फळ म्हणून, विरहानें पोळलेल्या अंतःकरणाला कायमची शांतता देण्याकरितां, माझ्या मनातलं चित्र आतां मी पुरं करणारच ! ”

असं म्हणून कामांध झालेल्या चंडीनें बाहू पसरून मदनरेखेवर झेप घेतली.

“ अविचार करूं नकोस ! थांब ! ” असं म्हणून स्वसंरक्षणासाठीं सावध राहिलेली राजकन्या चटकन् बाजूला झाली. चंडीचा तोल गेला, धाडदिशीं तो कोसळला, पाटाच्या कांठीं असलेल्या स्पाडावर त्याचं डोकं आदळलं आणि त्या धक्क्यानं त्याला जबरदस्त ग्लानि येऊन तो मूर्छित झाला. (क्रमशः)

• •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

[पान ३९ वरून चालू]

त्याचवेळीं त्यांनी मासूमला बरोबर आणून पन्हाळ्याच्या बंगल्यांत ठेवली आहे अशी बातमी कानावर आली! ह्या सफरीनंतर भाऊसाहेब बदलले एव्हढें मात्र खरें!

मासूम ही इंदूर-ग्वाल्हेरकडची सुप्रसिद्ध गायक-नर्तकी होती. स्वतःच्या कलेच्या नी सौन्दर्याच्या जोरावर तिनें अमाप पैसा व कीर्ति संपादन केली होती. धर्मानें ती मुसलमान होती. मी मी म्हणणारे जाहागिरदार नी संस्थानिक सर्वस्व ओवाळून टाकण्यास तयार असतांना, भाऊसाहेबां-सारख्या छोट्या इनामदारावर फिदा होऊन तिनें आपला गांव सोडून इथें येऊन रहावें, हें खरोखरच एक गूढ होतें! जणुं नाजूक गोजिरवाणी हरणी, ह्या वनराजावर आषक झाली होती!

भाऊसाहेब आणि मासूम ह्यांच्या संबंधा-बद्दल वेगवेगळ्या प्रकारची गुणगुण कर्णोपकर्णी ऐकूं येत होती. कुणी कुणाच्या अधिक आधीन झालें आहे, ह्याबद्दल चर्चा होत होती! कुणी असें मुद्दां म्हणत होते कीं मासूम भाऊसाहेबांशीं, त्यांना बाटवून शादी लावणार आहे! भाऊसाहेबांनीं ह्याबाबतींत मूकवृत्ती धारण केली होती. मासूमचा जलसा व्हावा, असेंही भाऊसाहे-बांच्या कांहीं रंगेल शौकिन मित्रांना वाटत होतें. पण तसें त्यांना सुचवण्याची कुणाचीही छाती नव्हती. मासूमचें नखही कुणाच्या नजरेस पडत नव्हतें! तिचा नोकर नाझू तिच्याबरोबर आला होता नी त्यांची सरबराई करत होता!

भाऊसाहेबांच्या पत्नीकडून बोलवणें आलें म्हणून मी त्यांच्या वाड्यावर गेलों. मुलांच्या आजाराची खबर होती. मी गेल्यावर लगेच त्यांच्या पत्नीनें गाऱ्हाणें सुरू केलें. ती म्हणाली, "डॉक्टरसाहेब, तुम्ही स्वारींचे जिगरदोस्त आहांत. तुम्ही तरी सांगून पहा कांहींतरी! मी अगदी हात टेकले. हद्द झाली! लोक नांवं ठेवूं लागलेत. छीथू व्हायला लागलीय, मुसलमानणीला घेऊन बसलेत्... ! इतके दिवस मी सारं सहन करत होतें, पण हें आतां मर्यादेच्या बाहेर गेलं! घरांतल्या धुसफुशीचा हा असा अंदाज होता. भाऊसाहेबांच्या पत्नीचा स्वाभिमान व भावना दुखावल्या गेल्या होत्या. मुलें अन्याय झाल्याप्रमाणें वागत होतीं. त्या संसारांत भाऊसाहेबांना कधींच गम्य नव्हतें! कर्तव्य ह्या दृष्टीनेंच ते घरांत पहात, हें मला माहित होतें! पत्नीनें घेतलेल्या पवित्र्यामुळें, आतां तर त्यांचें लक्ष्य साफच उडालें!

ते चूप होते म्हणून मीही चूप होतों. मध्यें पडून अवलक्षण करून घेणें, माझ्या मानी स्वभावाला पसंत नव्हतें. हें मौन माझ्याप्रमाणें भाऊसाहेबानांही असह्य झालें, एवढेंच मात्र खरें! कारण एक दिवस दुपारीं अचानक ते माझ्या दवाखान्यावर, गाडी घेऊन आले. मी जेवणाकरतां घरीं जायच्याच बेतांत होतों. मला ते म्हणाले, "चला डॉक्टरसाहेब, पन्हाळ्यावर जायचंय आपल्याला. घरीं फोन ऱ्या करून, नी कंपौण्डरला सांगा आज संध्याकाळीं येणार नाहीं म्हणून!" कशाचाही सोचविचार करूं न देतां, मला त्यानीं आपल्या स्वभावा-प्रमाणें, अशा अचानक रीतीनें गाडींत घातलें नी मोर्चा पन्हाळ्याकडे वळवला! वाटेंत अगदीं सहजगत्या ते म्हणाले, "डॉक्टर माझ्यावर रागावलाय ना? साहाजिकच आहे तें. तुम्हींच काय, घरदार समाज, इष्टमित्र, साऱ्यांचाच माझ्यावर घुस्सा झालाय?" माझा रागरंग त्यानीं बरोबर ओळखला म्हणून मी मनांत ओशाळगत झालो. मला पुढें बोलूं न देतां ते म्हणाले. "आतां तुम्ही पहालच डॉक्टर! मासूम आपली वाट पहा-तेय बरं! तिला पाहिल्यावर, माझा तो वरचा, पन्हाळ्यावरचा स्वर्गीय संसार अनु-भवल्यावर, मी इतका का बदललो तें आपल्या ध्यानांत येईल! असमाधानी मन रंगढंगांत सुख शोधत होतं. आतां मी पूर्ण समाधानी आहे डॉक्टर!" नंतर विषय बदलून ते पाठल्या सीटवर नजर फेकत म्हणाले, "आणि हा आमचा इमानी नाझू, बरंका अगदीं सच्चा सेवक! पूर्वी नौकरांची फलटण घेऊन मिरवणारां मी! आतां ह्या एका नोकराची खिदमदगारी मला भारी वाटते!" मी वळून पाहिलें त्या किरकोळ अंगाच्या माणसानं लवून मला आदब दिली!

पन्हाळ्याचा बंगल्यांतील छिनालपणा पार बदलून गेला होता! स्वच्छता आणि साधे-पणा ह्यांचेंच साम्राज्य होतें. जणुं राजाराणी आपल्या ऐश्वर्याला कंटाळून केवळ बदल म्हणून साधी रहाणी जगत होतें. खऱ्या प्रीतीमुळें अंतःकरणाच्या गोडव्यामुळें, ना खऱ्या भावनेमुळें साऱ्याच प्रकाराला निसंशय एक प्रकारचा खुमासदारपणा, मीपणा आणि सौन्दर्य प्राप्त झालें होतें हा संबंध अनैतिक होता हें मनांतही जर आलें नाहीं तर, सारेंच कसें नाजूक आणि हळुवार होतें. मासूमला पाहिल्यावर तिची अदबीची, नम्रतेची गोड वागणूक लक्षांत आणल्यावर, तिच्यावर क्षणाकरतां कां होईना जीव ओवाळून टाकावा, असेंच कुणाला वाटलें असतें! बाजीराव-मस्तानीची उपमा नकळत माझ्या मनांत डोकावली. तेथून निघतांना, भाऊसाहेब मला म्हणालें, "सांगा डॉक्टर माझ्यासारखा कुणी सुखी असेल कां ह्या जगांत? केवळ मानवनिर्मित शिष्टा-चारांसाठीं नि नीतिनिर्बंधांसाठीं मी हें सारं सोडून देऊं? आजपर्यंत पायीं चालत आलेल्या सुखाचा, मी कधींही अव्हेर केला नाहीं! मासूमसारखी गोड, कनवाळू, प्रेमळ आणि स्वार्थत्यागी मुलगी लाखांत एक मिळेल. तिचें सौन्दर्य तर अप्रतीम आहेच! केवळ भलत्या घराण्यांत तिचा जन्म झाला म्हणून ती विषवेल ठरली, नाहीं तर तिच्या-सारखी तीच तत्वनिष्ठ, नि कर्तव्यदक्ष! सोडू मी हें सारं सुख, समाधान नि शांती? हा हातीं आलेला ठेवा बाजूला लोटून देऊं? मासूम गेली तर हा भाऊसाहेब जगांत उरणार नाहीं!"

"तुमच्या सुखाला दृष्ट न लागो, म्हणजे मिळवली!" मीं मनांत म्हणालो. मासूम-मुळें इतरांप्रमाणें मीहि भाऊसाहेबांच्या सहवासाला दुरावलो होतों. ह्या प्रणयी युगुलाची प्रीति, आणि उन्मत्त प्रणय, आणि त्या सेवकाचा इमानीपणा सारेंच कांहीं विस्मयकारक होतें. ते सतत एकमेकांच्या सहवासांत असत. तिची कला फक्त त्यांच्याकरतां होती. दोघे मिळून सहलीला जात, सफरी करत, शिकारीला जात. हिंरव्यागार शेतांत तंबू ठोकून, हुरड्याचा कार्यक्रम करत! ह्या साऱ्या गोष्टींत एकटा नाझू समभागी असे,


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कारण तोच फक्त दिमतीला होता ! आमच्या अंतःकरणांत थोडीफार असूया उत्पन्न झाल्याशिवाय राहिली नाहीं.

जमाना बदलला. हिंदुस्थान-पाकिस्तान झालें, नंतर संस्थानें विलीन झालीं ! ऐश्वर्य जाऊन फक्त पदवी मागे राहिली. लोकांच्या मनांत जागृति होऊन, हक्कांची जाणीव होऊं लागली. इमानीपणा, स्वार्थत्याग आणि विश्वास हे सनातनी शब्द ठरले. भाऊंसाहेबांचे पैसे गेलेच होते, आतां त्यांची पतही कमी होऊं लागली ! आणि ह्या सर्वांचें खापर बिचाऱ्या मासूमवर फुटलें. भाऊसाहेबांच्या कुटुंबियांचेही खरें, आणि भाऊसाहेबांचेही तितकेंच खरें !

मासूम मात्र ह्या सर्व गोष्टींनीं आश्चर्यचकित होत होती. तिला पैसा नको होता, प्रीति पाहिजे होती. भाऊसाहेब स्वतःच्या मनाच्या समाधानासाठींच तिच्यावर पैशाची खैरात करून तिला दोघांचेंच जग हवें होतें आणि त्यांत निवांतपणा पाहिजे होता ! पण लोक तिला स्वस्थता देण्यास तयार नव्हते त्यांच्या मनांत तिच्याविषयीं अढी होती, कारण तिनें भाऊसाहेबांना त्यांच्यापासून हिरावून घेऊन, त्यांना चैनीस मुकविलें होतें. त्यांच्या कुटुंबियांना, त्यांच्याबाबतींत असणारी रुक्ष कर्तव्यतत्परता जांचत होती. पोरें बापाची ऐट आणण्याचें उसनें अवसान दाखवत होतीं, नी व्यसनाधीन होत होतीं. तीं व्यसनें त्यांना पेलत नव्हतीं ! पैशाच्या थैलीला अनेक भोकें उत्पन्न झालीं, नी चारी वाटांनीं ऐश्वर्याला ओहोटी लागली ! भाऊसाहेबांची मुस्कुटदाबी होत होती, पण वृथा अभिमानानें त्यांना बोलतां येत नव्हतें ! मासूममुळें भाऊसाहेबांना अनेक शत्रू उत्पन्न झाले. संकटाची छाया पडली आणि अडचणी विसरण्याकरतां भाऊसाहेब स्वतःवर मदिरेचा अंमल बसवून घेऊं लागले.

रयतेची नियत स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बदलली होती. भाऊसाहेबांच्या ह्या प्रीतीच्या संसारांत कधीं धर्माचा प्रश्न निघाला नव्हता, परंतु मासूमचा मुसलमानी धर्म लोकांच्या नजरेवर उत्तरोत्तर येऊं लागला होता. भाऊसाहेबांनीं अगोदरच आपल्यांत आणि समाजांत आडवी भिंत घातल्यामुळें लोक भडकले होते ! भाऊसाहेबांची कुटुंबिय मंडळी, इनामदारीची उसनी ऐट दाखवूं लागल्यामुळें व पोरें बहकल्यामुळें, जमिनी गहाण पडल्या ! आवाक्याबाहेर जाणाऱ्या परिस्थितीबरोबर, भाऊसाहेबही बेकाम होऊं लागले.

त्या काळांत मासूम हाच एक त्यांचा सर्वस्वैव आधार होती. तिचा स्वार्थत्याग अमूल्य होता ! तिनें पाण्यासारखा पैसा खर्च केला, पण फाटलेल्या आकाशाला ठिगळ कुठवर लावणार ? भाऊसाहेबांचें व्यसन तर अनावर होऊं लागलें होतें ! तिची परिस्थिती कळल्यामुळें तिची आई पन्हाळ्याला येऊन बसली, आणि तिला परत चलण्यास गळ घालूं लागली. मासूमचा पाय उचलत नव्हता ! भाऊसाहेब जर शेवटपर्यंत नशेच्या आधीन झाले नसते, तर ती त्यांना शेवटपर्यंत चिकटून राहिली असती ! पण परिस्थिती आटोक्यांत कशी आणावी ह्याचें जन्मापासून भाऊसाहेबांना ज्ञान नसल्यामुळें, दोघेंही असहाय्य बनलीं. त्यांचा आनंद करपून गेला !

लोकांनीं भाऊसाहेब बाटले आहेत म्हणून कंड्या उठवल्या, बंगल्याच्या आवारांत डुकराचें मुंडकें टाकलें आणि मासूमवर प्राणघातक छुपा हल्ला करण्याचाही प्रयत्न करण्यांत आला ! मद्याच्या आधीन झालेले भाऊसाहेब आतां कुठल्याही प्रकारें तिचें रक्षण करण्यास असमर्थ होते ! आपला प्राण-पाठीं ठेऊन, नाइलाजास्तव भाऊसाहेबांना माझ्या नि नाझूच्या ओटींत घालून ती निघून गेली ! आणि आम्ही आज ती जबाबदारी संभाळून बसलो आहोंत ! ती असती तर कदाचित् ते सुधारलेही असते, असें एकदां वाटते !

एकेकाळीं भाऊसाहेबांच्या जिवावर चैन करणारे लोक, त्यांच्यावरच उलटले. माणसांतलें पशुत्व अशा क्रूरतेनें जागें होत ! आणि आतां सदैव तांबरलेल्या डोळ्यांचे, थलथलीत शरीराचे, नशेंत असलेले भाऊसाहेब, आठवणी बुझवत बसले आहेत. खोल खोल बुडत आहेत अंधारबावेंत !

● ●

TO BEAUTIFY
YOUR Home
ALWAYS USE
KOTAH STONE

Available in: Three colours—Green, Brown (Yellowish) and Chocolate and in different sizes.

Head Office: Ramganjmandi (Rajasthan)
Branches: Surat, Delhi, Jaipur and Chandigarh Capital.

"KOTAH-STONE" laid in almost all important Government, Public or Private Buildings where beauty is desired to be combined with permanency.

ASSOCIATED STONE INDUSTRIES (KOTAH) LTD.,
Jan Mansion, 5th Floor,
Sir Phirozshah Mehta Road, Bombay.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



एक पानी कथा

# त्याची बायको

अमेरिकेंतलं आजचं सर्वांत अधीक छानछोकिचं ठिकाण म्हणून 'पामबीचचंच' नांव घ्यावं लागेल. आणि त्या पामबीचमध्यें ज्याला 'एवन्' म्हणतां येईल असं हॉटेल म्हणजे 'विटनेज्'

विटनेज् हॉटेलमध्यें मोठ्या प्रमाणांत जुगार खेळला जातो त्यामुळें जो कोणी पामबीचला येतो तो एक वेळ तरी विटनेज्ला भेट दिल्याशिवाय रहात नाहीं.

इथं ज्या तऱ्हेनं जेवण मिळतं तसं फ्रान्स, इटाली, जर्मनी अगर स्पेनमधील कुठल्याहि हॅाटेलांत मिळत नाहीं. तुम्ही तुम्हाला हवा तो पदार्थ सांगा तुम्हाला तो इथं मिळतो! मात्र पहिल्या खेपेला जेव्हां तुम्ही इथं येतां तेव्हां तुमचे डोळे दिपून जातात ते निरनिराळ्या टेबलाकडे बसलेल्या प्रसिद्ध आणि कुप्रसिद्ध व्यक्ति पाहून. दुपारच्या खान्यानंतर ही आकर्षक कपड्यांतील मंडळी खालीं जुगारखान्यांत जमा होतात. दुपारी दोनपर्यंत जुगारखाना तुडुंब भरतो, आणि पुढें तिथं पाऊल ठेवावयास जागा नसते. आणि ही गर्दी पहांटेपर्यंत ओसरत नाहीं. मॉंटे कार्लोपेक्षां इथली व्यवस्था छान आणि मनोहर आहे.

मला विशेष आकर्षण वाटतं तें श्री. विटने यांच्या व्यक्तित्वाचें. जेव्हां त्यांना भेटण्याची संधी मिळते तेव्हां मी ती कधींहि सोडती नाहीं.

एका छोट्याशा खोलींत श्री. विटने यांचं ऑफिस आहे. एक टेबल, दोन खुर्च्या एवढंच तिथलं फर्निचर. एखादी तिजोरी असेल नसेल.

त्यांच्या माझ्या पहिल्याच भेटींत गृहस्थ बरेचसे दृढनिश्चयी, थंड डोळ्यांचे व चेहऱ्यावर कोणतेहि हावभाव नसलेले असे मला दिसले. आपला जुगारखाना ते धंद्याच्या स्वरूपांत चालवतात. आणि आपण आपला धंदा यशस्वी रीतीनें चालवतों असा त्यांना अभिमान आहे. असं म्हणतात कीं त्यांचं वार्षिक उत्पन्न वीस लक्ष डालर्स एवढं अवाढव्य आहे. शक्य आहे!

एकदां मी त्यांना बोलतां बोलतां विचारलं कीं दरवर्षी तुमचं बडित येणं किती असतं?



तेव्हां अगदीं साहजिकपणें ते म्हणाले, "अंदाजे दोन लाख डॉलर्स।" जणूं काय दोन लाख डॉलर्स म्हणजे फारशी मोठी रक्कम नव्हे! एवढ्यांत त्यांचा चेहरा फुलून आला आणि ते हसत म्हणाले,

"एके दिवशीं मात्र मला फार विचित्र अनुभव आला. त्यादिवशीं सकाळीं मी माझ्या ऑफिसमध्यें बसलों असतां माझा शिपाई येऊन मला एक कार्ड देऊन म्हणाला, कीं बाहेर एक बाई बसल्या आहेत, त्या मला भेटूं इच्छितात. कार्डवर नांव होतं Mrs. John Rossiter. मी श्री. जॅान रोझीटर यांना ओळखत होतों. तेव्हां 'त्या बाईना आंत घेऊन ये' असं मी शिपायास सांगितलं.

थोड्याच वेळांत ती बाई आंत आली. व येतांच तिनें रडायला सुरुवात केली. तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. आणि ती ते रुमालानं टिपूं लागली. कांहीं वेळानं ती शांत झाली.

'माझे यजमान तुमच्या हॉटेलांत येऊन जुगार खेळतात' ती म्हणत होती 'आणि बुधवारी म्हणजे दोन दिवसांपूर्वी ते जुगारांत तीस हजार डॉलर्स हरले...'

मी जॉन रोझीटरना गेली ५।६ वर्षं ओळखतों. दरवर्षीं विशिष्ट मोसमांत ते इथें न चुकतां येतात. त्यामुळें एकमेकांना 'कसं काय?' म्हणण्याइतपत आम्हां दोघांची ओळख होती. जास्त नव्हती. पण तरीहि तो माणूस मला आवडतो. व्यवस्थित टापटिपीचा आणि कुणालाहि आवडण्याजोगा. पण तो इतका बेसुमार खेळत असेल याची मला कल्पना नव्हती. त्याच्या आकर्षक व्यक्तिमत्वाविरुद्ध हें बेदरकार खेळणं होतं. त्याचं आमच्याकडे खातं होतं. आणि परत जातांना तो हॉटेलच्या बिलाचा हिशेब अगदीं पैन् पै चुकता करीत असे.

ओघळलेले अश्रू रुमालानें टिपत ती बाई पुढें म्हणाली, 'माझं मोठ्यांत मोठं दुःख म्हणजे त्यांचं जुगाराचं व्यसन हेंच आहे.

जुगार न खेळण्याविषयीं मी त्यांना परोपरीनं विनवलं. तेवढ्यापुरतं ते माझं म्हणणं मान्य करतात, पण वेळ येतांच परत ते जुगाराकडे वळतात–परवां ते तीस हजार डॉलर्स हरलें–माझं सारं सोनंनाणं खलास झालं–त्यांच्याकडेहि कांहीं राहिलं नाहीं–आम्ही दोघं पूर्ण कफल्लक झालों–घर विकलं–विमा पॉलिसीवर कर्ज काढलं-माझ्या दोन्ही मुलीनां शाळेतनं काढलं-खर्च करणं अशक्य म्हणून-आणि आणि आतां मला स्वतःला नोकरी करावी लागेल...'

त्यांच्या मुलींनां शाळेतनं काढावं लागलं–त्यांचं शिक्षण अपुरं रहाणार हें ऐकतांच मला फार फार वाईट वाटलं. भावनाविवश होऊन म्हणा अगर इतर कांहींहि म्हणा मी त्या बाईला त्यांचे पैसे परत करण्याचं ठरविलं पण तें एका अटीवर—तिच्या नवऱ्यानें परत इथं जुगार खेळण्यासाठीं पाऊल टाकतां नये. स्वतःजवळ पैसे नसतांना माणसानं जुगार खेळूंच नये. तिनं डोळ्यांत अश्रू आणून मला वचन दिलं. आणि जेव्हां मी तिचे पैसे तिला परत केले तेव्हां तिला जे समाधान वाटलं तें पाहून, आपण आज एक सत्कृत्य केलं असं मला वाटलं.

ती बाई गेली आणि मी तो विषय विसरलों. पण दोन दिवसानीं सायंकाळी परत माझं लक्ष त्या विषयाकडे वेधलं. माझा मॅनेजर माझ्याकडे आला व मला म्हणाला 'साहेब जॉन रोझिटर आतांच आला आहे व नेहमीप्रमाणें तो खेळणार आहे असं वाटतं.'

सहसा मी जुगार खेळणारांत मिसळत नाहीं. तिथं जातहि नाहीं. पण माझा नेहमीचा शिरस्ता मोडून मी खाली जॉनकडे गेला व त्याला विचारलं, 'मिस्टर जॉन मला आपल्याशीं थोडंसं बोलावयाची इच्छा आहे. बोलूं का?'

'जरूर जरूर' तो म्हणाला.

"दोंन दिवसांपूर्वी तुमची सुशील पत्नी इथं आली व तुमच्या जुगार खेळण्यानं तिच्या संसाराची कशी वाताहात झाली तें तिनें मला डोळ्यांत अश्रू आणून सांगितलं–तुम्ही परवांच इथं तीस हजार हरलांत. आतां तुमच्या दोन्ही मुली शाळेतून घरीं आणल्यात —घर —"

"थांबा मि. विटने तुमचा कांहींतरी गैरसमज होतोय. माझं अद्याप लग्न झालेलं नाहीं."

अनु.: श्रीकृष्ण ठाकूर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका




*सातव्या शतकात श्रीविजय राजाचें साम्राज्य मलायांत होतें; पण पंधराव्या शतकांपासून अरबांचें राज्य आलें. मलायी भाषेचा संस्कृतशीं फार घनिष्ठ संबंध आहे...*

# फिक्का पाचू-काळा पाचू

—अनंत काणेकर

**२ जून १९५५**

उद्यां आमची बोट हाँगकाँग सोडणार. प्रातरुपाहार झाल्यानंतर गांवांत गेलों, आणि दुपार होईपर्यंत हाँगकाँगच्या रस्त्यांवरून यथेच्छ भटकलों. दुपारी बंबवाल्यांनीं शॅंको नांवाच्या रशियन हॉटेलांत जेवावयाला नेलें. जेवण फारच रुचकर होतें. गेल्या कित्येक दिवसांत इतका साजूक 'राइस' आणि इतकी चवदार भाजीपाल्याची 'करी' खाल्ली नव्हती. स्वच्छ आणि रुचकर शाकाहारी जेवण हें या रशियन हॉटेलाचें वैशिष्ट्य आहे, बंबावाले म्हणाले.

युनायटेड कमर्शिअल बॅंकेचे इथले पंजाबी मॅनेजर श्री. रुसीन हे बंबावाल्यांचे मित्र आहेत. आज संध्याकाळीं ते आपल्या मोटारीतून आम्हांला हाँगकाँगचें 'पीक्' हें हाँगकाँगमधल्या डोंगरांचें सर्वांत उंच शिखर पहायला नेणार आहेत. हें १८०० फूट उंच आहे, तिथें मोटारीनें किंवा पिनांगमध्यें आहे तशा 'रोप रेल्वेनें' वर जातां येतें.

'हॅपी व्हेली'च्या कड्यावर डोंगर खोदून बांधलेल्या सुंदर घरांपैकीं एकांत श्री. रुसीम रहातात. डोंगरांतल्या आठशें फूट उंचीवरल्या या घरांतून समोरची 'हॅपी व्हॅली' आणि हाँगकाँग शहराचा देखावा फारच मनोहर दिसतो. सौ. रुसीम यांनी गरम गरम भजी आणि चिवडा कॉफीबरोबर खायला दिला. बरेच दिवसांनी मिळालेलें हें मराठी खाद्य मिटक्या मारीत खाऊन आम्ही व रुसीम-मंडळी 'पीस्' पाहयला बाहेर पडलों.

हिरव्यागार झाडींतून 'पीक्'कडे जाणारा रेखीव मोटाररस्ता, 'पीक्' वरचें टुमदार हॉटेल, सगळ्या हाँगकाँगचें विहंगदर्शन घेण्याकरतां डोंगराच्या कडेकडेनें केलेला चिमुकला पायरस्ता, तिथून ठिकठिकाणीं दिसणारे हाँगकाँगमधले छोटेछोटे निळेनिळे उपसागर, त्यांना वेढणारे कुठें पिवळसर तर कुठें शुभ्रसफेत चमचमणारे वाळूचे पट्टे,—खरोखरच एखाद्या अद्भुतरम्य नंदनवनांत वावरतों आहोंत असें कांहीं क्षण वाटलें. हाँगकाँग आणि सिंगापूर दोन्ही पाचूसारखी हिरवीगार बेटें आहेत; पण एकाचा प्रातःकाळच्या प्रकाशांत चमचमणाऱ्या पाचूसारखा गवती हिरवा रंग, तर दुसऱ्याचा सायंकाळच्या दाटणाऱ्या छायांतल्या पाचूसारखा काळसर हिरवा रंग.

**३ जून १९५५**

आज दुपारी १२ ला बोट हाँगकाँगहून सिंगापूर, पिनांग, कोलंबो, मुंबई हा प्रवास सुरू करणार. सकाळीं चहानंतर बंदराजवळच्या रस्त्यावरून भटकून अकराच्या सुमारास बोटीवर परत आलों, तेव्हां हाँगकाँगला चढलेल्या नव्या चिनी, हिंदी—विशेषतः सिंधी आणि युरोपियन स्त्रीपुरुष उतारूंचा आणि त्यांना पोहोंचवायला आलेल्या मित्रमैत्रिणींची बोटीवर एकच गर्दी उसळली होती. हिंदी, सिंधी, चिनी इंग्रजी शब्दांचा प्रचंड कलकलाट, फेसाळणाऱ्या बिअरच्या ग्लासांतून दरवळणारा उग्र दर्प आणि या सर्व ध्वनींना आणि गंधांना एकत्र गुंडाळू पहाणारीं सिगारेटच्या धुराचीं तरल वलयें यानीं सर्व बोट भरून गेली होती. बोट सुटण्याचा कर्कश भोंगा किंचाळला तसे पोहोचवायला आलेले लोक बोटीच्या जिन्यावरून उतरून खालीं धक्क्यावर जाऊन उभे राहिले, आणि बोटीच्या कठड्यावरून हिरव्या पिवळ्या लाल कागदाच्या सुरळ्या प्रवासाला निघणाऱ्यानीं खालीं धक्क्यावरल्या ज्याच्या त्याच्या मित्रानें किंवा नातेवाइकानें त्या त्या सुरळीचें टोंक धरून कागदी दुव्याचें शेवटचें स्नेहसंबंध जोडले. एकदोन मिनिटांत बोट थडथड फडफड करून धक्क्याकडून झपाट्यानें दूर जाऊं लागली तशी हे कागदी बंध सुटून किंवा तुटून हताशपणें बोटीच्या बाजूला गळून पडले.



बोट सुटायच्या आधीं आणखीहि गमती बोटीच्या दुसऱ्या बाजूला चालल्या होत्या. आपलीं लहान लहान होडकीं किंवा सांपन घेऊन होडीवाले चिनी स्त्रीपुरुष उतारूनीं वरून उडवलेली दहा सेंटचीं नाणीं, लांब बांबूच्या काठीला लावलेल्या छोट्याशा जाळ्यांत अलगद








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पकडण्याचें कौशल्य दाखवीत होते.

बोट बंदराबाहेर पडली आणि समुद्रानें रुद्रावतार धारण केला. दुपारीं चहाच्या वेळेला तर बोट इतक्या जोरानें हालत होती कीं एका टेबलावरल्या चहाच्या कपबशा किटली वगैरे लांब उडवल्या जाऊन त्यांचा चक्काचूर झाला.

चहा पिवून स्मोकिंगरुममध्यें आम्ही बसलों होतों. कांहीं चिनी आणि इंग्रज बायका समोरच्या कोपऱ्यांतल्या कोचावर आणि खुर्च्यांवर बसल्या होत्या. एकदम बोट एका बाजूला इतकी कलंडली, कीं त्यांच्या खुर्च्या, कोच घसरत दुसऱ्या कोपऱ्यांत गेल्या, आणि त्या बायका एकावर एक पडून त्यांचा ढीग झाला. त्यांच्या ओरडा-आरडीनें साऱ्या बोटीची करमणूक झाली !

### ४ जून १९५५

हॉंगकॉंगमधल्या मेडिकल कॉलेजांत शिकणारे सिंगापूर, पिनांगमधले पुष्कळ चिनी विद्यार्थी साडेतीन महिन्यांची सुट्टी सुरू झाल्यामुळे आमच्या बोटीवरून घरीं जात आहेत. सकाळच्या चहानंतर डेकवर गेलों तेव्हां या विद्यार्थ्यांनी थट्टामस्करी, खेळांची दंगल उडवलेली दिसली. मोठमोठ्यानें ते इंग्रजी संघगीतें म्हणत होते, मुलींची थट्टा करीत होते, एकमेकांना रबरी चेंडू मारण्याचा खेळ खेळत होते. एकाचा चेंडू डेकवरल्या खुर्चीवर बसलेल्या एका वयोवृद्ध इंग्रजाच्या बायकोच्या डोक्याला लागला, व तो संतापाने उसळून त्या विद्यार्थ्याच्या अंगावर धांवण्याकरता उठला. पण विद्यार्थ्यांनी दिलगिरी व्यक्त केल्यावर तो खालीं बसला. यप्रकारानंतर दंगल थोडी कमी झाली.

एक तरतरीत चिनी विद्यार्थी माझ्याबरोबर गप्पा करीत होता. तो म्हणाला, ' तुमच्याकडल्या मेडिकल कॉलेजांचा अभ्यासक्रम मी पाहिला. तुमच्याकडे दोन वर्षांत करावा लागणारा अभ्यास इकडे आमच्याकडून नऊ महिन्यांत करून घेतात हो !—रात्रीं दोनदोन वाजेपर्यंत वाचावें लागतें; पुन्हां सकाळीं आठ वाजतां कॉलेजचें काम सुरू होतें. ऑस्ट्रेलियांतला एक प्रख्यात प्रोफेसर आमच्याकडे शिकवायला आला आहे. तो जागतिक कीर्तीचा विद्वान् आहे; पण भारी कडक. आमच्या टिप्पणवह्यांत कांहीं चुकीचें दिसलें कीं सरळ त्यांचे तुकडे करून कचऱ्याच्या टोपलींत टाकून देतो ! शिकवतो मात्र फारच छान. अभ्यासाचा इतका भार पडतो कीं गेल्यावर्षी आमच्याबरोबरच्या एका हिंदी विद्यार्थ्याचें डोकें फिरलें !

आज संध्याकाळीं समुद्राकडे पहात डेकवर बसलों होतों. पाऊस पडून गेला होता. आकाश स्वच्छ होतें, समुद्र अगदीं शांत होता. सूर्याचा सोनेरी गोळा रुबाबांत पाण्याखालीं जात होता.



### ५ जून १९५५

काल्च्या सोनेरी सूर्यास्ताइतकाच आजचा गुलाबी चन्द्रोदय सुंदर होता. सूर्यास्त, चन्द्रोदय हीं नेहेमीचीं दृश्यें, पण शहरांतून तीं दिसतात त्यापेक्षां वरती आकाश आणि खालीं समुद्र अशा ठिकाणीं एक वेगळेंच जादूचें जग निर्माण होतें. मला वाटतें, आज पौर्णिमा असावी. चंद्र समुद्रांतून वर येतांना त्याच्यावर गुलाबी छटा दिसत होत्या. वर येऊन तो ठळक डोळ्यासमोर आला तेव्हां सुंदर पिवळा दिसूं लागला; आणि आकाशांत खूप वर गेला तेव्हां स्वच्छ शुभ्र झाला.

### ६ जून १९५५

आज सकाळीं डेकवर आलों आणि समुद्राकडे पाहिलें तेव्हां भीतीची एक लहर एकदम मनाला चाटून गेली. अतिशय दंगेखोर मूल एकदम शांत होऊन स्वस्थ बसलें, आणि बोलेचालेनासें झालें तर कसें वाटेल ?—तसें कांहींसें वाटलें. समुद्राला झाले आहे तरीं काय ? शांत, शांत म्हणजे किती शांत ? क्षितिजापर्यंत लहरत गेलेल्या एखाद्या स्वच्छ, तुळतुळीत काचेच्या पाटीसारखा समुद्र दिसतो आहे. बोटीवरून उतरावें, आणि या अजस्र कांचेवरून क्षितिजापर्यंत मजेंत चालत जावें !

### ७ जून १९५५

सकाळीं ७ ला सिंगापूरच्या धक्क्याला बोट लागली. परततांना सिंगापुरांत आम्ही दोन दिवस रहाणार हें सोनाळकरांना माहीत होतेंच. बोटीवर चहापाणी संपवून १० वाजतां सोनाळकरांच्या बँकेंत गेलों. उंगकू अब्दूल अझीझ यांनीं मागल्या भेटींत आपलें मलाया विद्यापीठ पाहायला बोलावलेंच होतें. तें सकाळीं पाहायला जायचें आणि रात्रीं उंगकूंच्या घरीं जेवायचें असा बेत ठरला होता. सोनाळकरांच्या गाडींतून सिंगापूरच्या एका टोकाला शांत डोंगराळ भागांत असलेल्या मलाया विद्यापीठांत गेलों.

विद्यापीठाभोंवती प्रशस्त बाग आहे. एक मोटी थोरली लांबच लांब पिवळी इमारत आवारांत दिसली. उंगकू म्हणाले, जपान्यांनी आपल्या औटघटकेच्या कारकीर्दींत ही बांधली. आपला अर्थशास्त्रविभाग दाखवितांना त्यांनी एक बेरजावजाबाक्या, गुणाकारभागाकार चुटकीसरशा करून दाखविणारें यंत्र दाखविलें. ते थट्टेनें म्हणाले, हें यंत्र लग्न करावें की नाहीं याही तुमच्या प्रश्नाचें चटकन् उत्तर देईल असें मी माझ्या विद्यार्थ्यांना केव्हां केव्हां सांगतों ! कांहीं दालनांत विद्यार्थ्यांच्या परीक्षा चालल्या होत्या, आणि इंग्रज प्रोफेसर बाया देखरेख करीत होत्या. विद्यापीठाचें अद्यावत् ग्रंथालय ' एअर कंडिन्ड ' आहे. सिंगापूर सारख्या विषुववृत्तावरल्या ऊष्ण प्रदेशांत वाचनलेखन करायला असे कांहीं तर गारव्याचें ठिकाण हवेंच. ही व्यवस्था केल्यापासून पुष्कळ विद्यार्थी आपला बराचसा वेळ ग्रंथालयांत घालवतात आणि साहाजिकच त्यांचा अधिक अभ्यास होता, असा उंगकूंनी आपला अनुभव सांगितला कांहीं दुर्मिळग्रंथांच्या मायक्रोफिल्म त्यांनी आम्हाला दाखवल्या.

विद्यापीठाच्या मलायीभाषा विभागांत गेलों तेव्हां त्या विभागाचे वयोवृद्ध प्रमुख




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रोफेसर झैनुल अबेदिन बिन अहमद यांची त्यांनी ओळख करून दिली. सुकार्नोटोपी आणि पांढरा सूट घातलेल्या खूप लठ्ठ ठेंगू पण अत्यंत विनोदी आणि सुस्वभावी असलेल्या प्रोफेसर झैनुल अबेदिनांचें व्यक्तित्व आकर्षक आहे. त्यांच्याशीं गप्पा करतांना केव्हां वेळ गेला तें कळलें नाहीं. अरबस्तानाचा नकाशा त्यांच्या खोलीच्या भिंतीवर होता; तो पाहून मी म्हटलें, हा इथें कशाला ? " आम्ही लोक धर्मनिष्ठ मुसलमान आहोंत, " ते म्हणाले, " हा देश तर आमची पवित्र भूमि. सातव्या शतकांत तुमच्याकडल्या श्रीविजय राजाचें साम्राज्य इथें मलायांत होतें; पण पंधराव्या शतकापासून अरबांचें राज्य इथें आलें. मलाया तसा भाषादृष्ट्या फार मागासलेला आहे. मलायाचा पहिला इतिहास १९१६ सालीं लिहिला गेला. सांध्यआमच्या विद्यापीठांत मलायी आणि चिनी भाषांचे विभाग आहेत. आमच्या देशांत हिंदी म्हणजे तामीळ लोकहि दहापंधरा टक्के आहेत. बहुधा पुढल्या वर्षापासून तमीळ विभागहि उघडला जाईल. नंतर कदाचित् संस्कृतच्या अभ्यासाचीहि सोय होईल. मलायीचा संस्कृतशीं फार घनिष्ठ संबंध आहे हें तुम्हाला माहित असेलच. "

उंगकू अझीझ यांच्या पत्नी या विभागांत काम करीत असलेल्या दिसल्या. तुम्ही मलायीच्या प्रोफेसर म्हणून इथें काम करतां कीं काय ? मी त्यांना विचारलें. छेहो, त्या म्हणाल्या, मी पदवीधरहि नाहीं ती प्रोफेसर कुठली होणार ?—या विभागाची सेक्रेटरी–टायपिस्ट म्हणून मी काम करतें !

विद्यापीठाचे ग्रंथपाल एक इंग्रज गृहस्थ आहेत. त्यांच्या टेबलावर भारतसरकारनें प्रसिद्ध केलेलें भारतीय नाट्यावरचें पुस्तक पडलें होतें. म्हैसूर विद्यापीठाचे प्रोफेसर नीळकंठशास्त्री मलाया विद्यापीठाला भेट देऊन गेले होते. त्यांनी म्हैसूर आणि त्रावणकोर विद्यापीठांनीं छापलेलीं कांहीं पुस्तकें आणि तत्वज्ञान, वैद्यकशास्त्र, अलंकारशास्त्र वगैरेवरले कांहीं संस्कृत ग्रंथ मलाया विद्यापीठाला भेट दिले. ते ग्रंथपालांनी मोठ्या आस्थेनें आम्हाला दाखविले. दुपारीं १२ च्या सुमारास आम्ही सोनाळकरांच्या बँकेंत परत आलों, आणि नंतर त्यांच्या घरीं जेवायला गेलों. आगासकर, नंदू नाटेकर, वगैरे बॅड्मिन्टन सामन्यांत भाग घ्यायला सिंगापुरांत आलेल्या खेळाडूंना आज त्यांच्याकडे जेवण होतें. ताट, पाट, रांगोळ्या वगैरे इरसाल मराठी थाटांत श्रीखंडपुरी, मसालेभात वगैरेंचे चमचमीत भोजन होतें ! हे खेळाडू इथून विमानानें पिनांगला खेळण्याकरतां जाणार, आणि मग पिनांगहून आमच्याच बोटीने मुंबईला परतणार.

दुपारच्या चहानंतर साडेचार पांचच्या सुमाराला सोनाळकरांनीं आम्हाला सिंगापूरच्या एका टोकाला असलेला 'चांगी बीच' पाहायला नेलें. खूप लांबच लांब चौपाटी आहे, पण जुहू इतकी सुंदर नाहीं. माणसेंहि फारशी नव्हती. खाद्यपदार्थ विकणारे आमच्या भेळपुरीवाल्यासारखे कांहीं चिनी हातगाडीवाले दिसले. फिरायला येणारे साहेब लोक इथें हातगाडीवरले चिनी पदार्थ मोठ्या आवडीनें घेऊन खातात.

बोटीवर येऊन आम्ही कपडे बदलले आणि श्री. व सौ. सोनाळकर यांच्याबरोबर विद्यापीठाजवळ असलेल्या उंगकू अझीझ यांच्या बंगल्याकडे जेवायला जायला निघालों. तिथें पोहोचेपर्यंत रात्रीचे पावणेनऊ वाजले. इतर पाहुणेमंडळी बीअर, संत्र्याचा रस वगैरे पीत आमची वाटच पहात बसली होती. सकाळीं विद्यापीठांत भेटलेले प्रोफेसर झैनुल अबेदिन तिथें होतेच. त्यांच्या मलायी विभागांत काम करणारे तरुण डच प्रोफेसर डॉ. तेजॉंग आणि सौ. तेजॉंगहि आल्या होत्या. तेजॉंग मंडळी लवकरच हॉलंडला परत जायची होती. मलायीचा अभ्यास करणाराला संस्कृतचें चांगलें ज्ञान असावें लागतें याचा तेजॉंगशीं बोलतांना अनुभव आला. 'असद्रिजानलो नाम' हें संस्कृत वाक्य ते सहज बोलून गेले. सिंगापूरजवळच असलेल्या जोहोरे बहारू संस्थानाच्या सचिवालयांत डेप्युटी सेक्रेटरी असलेले उंगकूंचे मित्र चे. अब्दुल्ला आणि त्यांची पत्नीहि जेवायला होती. मसालेदार रस्स्याची कोंबडी, गुलाबी रंगाचा आकर्षक रीतीनें टेबलावर ठेवलेला मासा, अनेक रंगांच्या बहुरंगी चटण्या वगैरेंचें छानदार जेवण होतें. मलायांत या कोंबडीच्या रस्स्याला 'पांगान' म्हणतात असें कळलें. आम्हीं पांगानवर चांगलाच हात मारला.

जेवणानंतर मलायी आणि जपानी गाण्यांच्या कांहीं ध्वनिमुद्रिका उंगकूनी वाजवून दाखवल्या. उंगकूना जपानी भाषा चांगली येते. महायुद्धांत जपाननें सिंगापूर आणि मलाया घेतला तेव्हां जोहोरे—बहारू वगैरे संस्थानांचे मलायी सुलतान आणि जपानी अधिकारी यांना एकमेकांना समजावून सांगण्याचें दुभाषाचें काम मीच करीत होतों, उंगकू अझीझ म्हणाले.

नंतर इंडोनेशियांतल्या कपीराजा नृत्याची एक ध्वनिमुद्रिका त्यांनीं लावली. आपल्याकडले कथ्थकांचे बोल आणि मंत्रघोष ऐकल्यासारखें वाटलें. मारुतीची वानरसेना ओरडत असल्याचे आवाज मधून मधून

( पान ५२ वर )



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




**इंग्रजींतील दूरदृष्टि**

## लोकहितवादींची पत्रें

'लोकहितवादींची शतपत्रें' हा मराठी भाषेंतील अमोल ठेवा आहे. १८४८ ते ६६ या काळांत लोकहितवादींनी 'प्रभाकर' पत्रांतून हीं पत्रें प्रसिद्ध केली आणि तत्कालीन विचारवंतांचें लक्ष आपल्याकडे वेधवून घेतलें. या पत्रांतून राजकीय, सामाजिक आणि धार्मिक बाबतींत लोकहितवादींनी जे सडेतोड आणि प्रामाणिक विचार प्रकट केले ते तत्कालीन समाजधुरीणांना धक्का देणारे ठरले. शंभर वर्षांपूर्वी आपल्या या पत्रांतून लोकहितवादींनी असें राजकीय भविष्य वर्तवलें होतें कीं, १०० वर्षांनी या देशांतील लोक इंग्रजांस चालते व्हा म्हणून सांगतील आणि स्वतःचें पार्लमेंट चालवतील. रानडे, आगरकर यांच्यासारख्या नेत्यांच्या कार्याची खरी बैठक आणि पार्श्वभूमि लोकहितवादींनी तयार केली. पण काळाच्या मानानें लोकहितवादींचे विचार फारच पुढें गेले असल्यामुळें त्या काळच्या लोकांना ते पचले नाहींत. मात्र त्यांमुळें त्याची किंमत मुळींच कमी होत नाहीं.

आज शतपत्रांची दुसरी आवृत्ति कॉंटिनेंटल प्रकाशनचे रसिक आणि चोखंदळ संचालक श्री. अनंतराव कुलकर्णी यानीं प्रसिद्ध केली आहे. या आवृत्तीस डॉ. ना. र. इनामदार यांनीं ६७ पृष्ठांची विवेचक आणि साक्षेपी प्रस्तावना जोडली आहे. डॉ. इनामदार यांनीं या प्रदीर्घ प्रस्तावनेंत लोकहितवादींच्या कालखंडांतील महाराष्ट्राच्या वैचारिक पार्श्वभूमीची ओळख करून दिली असून त्या पार्श्वभूमीवर लोकहितवादींचे हे विचार कसे अस्सल आणि वेगळे वाटतात याचें साधार आणि सुसूत्र विवेचन केलें आहे आणि त्यामुळें अभ्यासकांस आणि विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांना संदर्भ म्हणून या प्रस्तावनेचा फार उपयोग होईल. याशिवाय त्यांनीं शतपत्रांची विषयवार वर्गवारी केली असून तीहि मार्मिक आहे. सुमारें ४५० पृष्ठांच्या या ग्रंथराजाचें बहिरंग आणि आंतील सुरेख छपाई कॉंटिनेंटलच्या प्रकाशनांच्या पूर्वकीर्तीस साजेशी आहे.

( प्रकाशकः—कान्टिनेंटल प्रकाशन, पृष्ठें ४५० किंमत दहा रुपये )

—बाळ सामंत

● ●

**तरूण मनाची साक्ष**

## वेताळ प्रसन्न

लोकांना पोटभर हंसविणाऱ्या परंतु स्वतः मानसिक पीडेनें त्रासलेल्या हरक्वीन या इंग्रजी रंगभूमीवरल्या नटाची ही गोष्ट आहे. एकदां तो पीडेनें व्याकूळ होऊन डॉक्टरांकडे गेला. डॉक्टरांनीं त्याला काळजीपूर्वक तपासलें आणि सांगितलें, " तुमची मानसिक पीडा नाहींशी व्हायला एकच उपाय आहे ! "

" कोणता ? " हरक्वीननें उत्सुकतेनें विचारलें.

" हरक्वीन या विनोदी नटाची नाटकें पहाणें. जितकीं त्याची नाटकें पहाल तितकी तुमची प्रकृति सुधारेल ! "

दत्तू बांदेकरांच्या 'वेताळ प्रसन्न' या लेखसंग्रहाच्या पहिल्याच पानावर लिहिलेलें त्यांचें निवेदन वाचलें कीं या हरक्वीन नटाची आठवण होते ! दत्तू बांदेकरांच्या निधनानंतर प्रकाशित होणारा त्यांचा हा पहिलाच लेखसंग्रह. बांदेकरांचें बरेंचसें लिखाण वृत्तपत्रीय. त्याच लिखाणांतून निवडून घेतलेले नऊ लेख आणि एक तमाशा. वृत्तपत्रीय लिखाणाची सर्वसाधारण यत्ता म्हणजे प्रचारकी थाटाचें वाङ्मयीन मूल्यें वेताचें असलेलें लिखाण. पण याला अपवाद म्हणजे बांदेकरांचें लिखाण.

'वेताळ प्रसन्न' मध्यें संग्रहीत केलेल्या लिखाणाला एक पातळी आहे. तें नुसतेंच विनोदी नाहीं. कारुण्याची, भयंकर सत्याची किनारहि त्याला जोडलेली आहे. [ 'वर पाहिजे', 'नारीभक्षक' ] लेखनांतला विनोद हा माध्यमापुरताच. खरा प्रयत्न आहे तो लेखकाला दिसलेलीं जनतेचीं सुखदुःखें आणि समाज—राजकारणांतील झुंडशाही आपल्या मगदुराप्रमाणें मांडण्याचा. [ रेडिमेड मुलगा ' 'एका टॅक्सीचें शोचनीय निधन' 'भुकारामची मुलाखत', 'छबेली पार्टीचा तमाशा' ]

बांदेकरांच्या मानवी स्वभावांच्या अभ्यासाची उदाहरणें तरी किती द्यावं त ! 'रेडिमेड मुलगा' मधील मालती आणि माधवराव, 'वर पाहिजे' मधील प्रौढ तरुणी, 'नारीभक्षक' मधले प्रांतसाहेब, 'भुकारामच्या मुलाखतीं'तला भुकाराम, सगळीं पात्रें वेगवेगळ्या व्यवसायांतली, वेगवेगळ्या जगांतली पण बांदेकरांनीं त्यांना त्यांच्याच अस्सल रूपांत उभें केलेलें ! त्यांच्या लिखाणाचे विविध पैलू दर्शविणारा हा लेखसंग्रह त्यांच्या वाङ्मयीन कीर्तींत भर घालणारा ठरला आहे; लेखणी वृत्तपत्रीय लेखनापुरतीच मर्यादित नाहीं हें दाखवून देणारा ठरला आहे !

संग्रहांत अुत्कृष्ट आणि खरोखरच नाट्यमय कलाकृति म्हणजे पांच हजारांचा पंचनामा ! बांदेकरांच्या लेखणीचा स्वैरविलास या लेखांत आढळतो. नाट्य, विनोद आणि अुपहास यांचें हें रसायन मनाला चकित केल्याशिवाय रहात नाहीं.

लेखनसृष्टींतील बांदेकरांचें जीवन अुपेक्षित आणि खडतर होतें. त्यांच्या विनोदानें कारुण्याचा हात धरला आहे तो याचमुळें. आपल्या व्यवसायाचा ते स्वतःच विनोदगर्भ अुपहास करतात. ते म्हणतात " अितर कोणताहि व्यवसाय करण्याची मला अक्कल नसल्यामुळेंच मी लेखन करीत असतों...लिहितांना काड्याची पेटी मी जवळ बाळगतों—विडी ओढण्यास अगर नको असलेलें लिखाण जाळण्यास ! " आपल्या विनोदी लेखनानें वाचकांना हंसवणारा असा हा दुःखी 'हरक्वीन' !

बांदेकरांच्या तरुण मनाची साक्ष देणारें हें लिखाण वाचून झाल्यावर ते आज आपल्यांत नाहींत या गोष्टीची जाणीव मन कुरतडवूं लागते !

( लेखक : **दत्तू बांदेकर,** प्रकाशक : चंद्रकांत शेट्ये, प्रकाशन मंदिर, कोल्हापूर, मूल्य : अडीच रुपये. )

**—नरोत्तम**

● ●





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सांचेबंद कथा—

## चांदण्याची वेल

धार्मिक पुस्तकांच्या प्रकाशनांत आघाडीवर असणारे प्रकाशक बा. ल. पाठक यांनीं आतां वाङ्मयीन क्षेत्रांत पदार्पण केलें आहे ही गोष्ट म्हणजे बदलत्या काळाचीं पावलें ओळखून त्यांनीं टाकलेलें स्वागताई पाऊल.

पाठकांचें पहिलें गाजलेलें प्रकाशन म्हणजे 'कन्यादान'. हा महादेवशास्त्री जोशी यांचा कथासंग्रह. त्यानंतर त्यांनीं चांदण्याची वेल हा चारुशीला गुप्ते यांचा कथासंग्रह प्रसिद्ध केला आहे. चारुशीला गुप्ते या अध्यापन, राजकारण आणि साहित्य या तीन्ही आघाड्यांवर दिसतात.

चांदण्याची वेल हा कथासंग्रह अगदींच सुमार आहे. त्यांतील पहिलीच 'चांदण्याची वेल' ही कथा अत्यंत निर्जीव आणि सांचेबंद आहे. मध्यमवर्गीय जीवनांतील कांहीं प्रसंग टिपण्याचा प्रयत्न त्यांनीं अनाहूत, स्पर्श, नाजूक क्षण या कथांत केला आहे, पण तोहि अगदींच सामान्य आणि वरवरचा आहे. स्त्री लेखिकेला उत्तेजन देण्याचें दाक्षिण्य न दाखवता प्रकाशकांनीं यापेक्षां सरस साहित्य निवडण्याचा प्रयत्न करावा. पुस्तकाच्या अंतरंगापेक्षां त्याची छपाई आणि मुखपृष्ठ सरस आहे हें नमूद केलें पाहिजे.

( लेखिका : **चारुशीला गुप्ते**, प्रकाशकः बा. ल. पाठक, पृष्ठें १०६, किंमत २॥ रु. )

**— बाळ सामंत**

• •

एक अभिनव प्रकाशन

## शिल्पांजली

सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट मधील 'अप्लाइड आर्ट' या विभागाच्या रौप्यमहोत्सवानिमित्त प्रसिद्ध झालेल्या 'शिल्पांजली' या प्रकाशनाचें अत्यंत बांधेसूद रूप पाहून प्रथमदर्शनींच आनंद होतो. आणि याबद्दल संपादक मंडळाचें अभिनंदन करावेंसें वाटतें.

अभिनव अशा मुखपृष्ठापासून वेचक मजकुर असलेल्या शेवटच्या पानापर्यंत,




**तुमच्या मुलांची कॉलेजची फी आम्ही देऊं....**

समजा, आज तुमचं वय ३० वर्षं आणि तुमच्या मुलाचं १ वर्ष, तुमचा मुलगा कॉलेजांत जाऊं लागेल तेव्हां तुमचं वय ५० असेल. निरनिराळ्या वाढत्या कौटुंबिक अडचणीमुळें किंवा दुर्दैवानं त्यावेळीं तुम्ही हयात नसलात तर त्याचे कॉलेजचे शिक्षण होणें कठीण जाईल. पण ही अडचण आयुर्विमा पॉलिसी घेऊन तुम्ही सोडवूं शकाल. एकदा मुलाचे शिक्षणाकरितां पॉलिसी घेतली कीं, त्याचे शिक्षण निश्चित पूर्ण होईल.

विमा जेवढा लवकर उतरवाल तितका हप्ताहि कमी बसेल, तेव्हां आजच विमा उतरवून आपल्या लाडक्याचा भविष्यकाळ निश्चित करा.

आयुर्विम्याला दुसरा पर्याय नाहीं





**लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इंडिया**

Pratibha-60








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

वैविध्यपूर्ण रचना, उत्तम सजावट आणि चित्रकलेतल्या वेगवेगळ्या विभागांतील विचारधारा, यामुळें प्रकाशन भरीव आणि ठसठसीत वाटतें.

लंडन येथील डिरेक्टर ऑफ डिझाइन रिसर्च युनिटचे मि. ब्लॅक, हर्बर्टरीड, सर गोर्डन रसेल या परदेशी तज्ञांबरोबरच मुल्कराज आनंद, प्रो. बेन्द्रे, आर. व्ही. लेडन व श्री. व्ही. एन्. आडारकर या भारतीय कलाविश्वांतील तज्ञांचें साहित्य उल्लेखनीय तसेंच मार्गदर्शक आहे. या साहित्यासोबत संस्थेच्या माजी आणि नामवंत विद्यार्थ्यांच्या विचारांचा आणि निवडक कलाकृतींचा समावेश प्रकाशनांत केल्यानें त्याला एक भारदस्त असें स्वरूप आलेलें आहे. एकंदरीत या प्रकाशनामुळें पंचविशी ओलांडलेल्या 'अप्लाइड आर्ट' या संस्थेचा भविष्यकाल उज्ज्वल यशाची ग्वाही देणारा वाटतो.

एक गोष्ट थोडीशी खटकते ती ही कीं, एवढ्या या वजनदार प्रकाशनांत तेवढ्याच तोलाच्या कांहीं रंगीत कलाकृती अवश्य दिल्या पाहिजे होत्या. तेवढी एक उणीव आवर्जून जाणवते !

— गोपालन्

● ●

**दुर्लक्षित संपादन**

## रूपभेद

स्कूल ऑफ आर्टच्या 'कलादीप' या मंडळानें काढलेला 'रूपभेद' हा वार्षिकांक 'शिल्पांजली' या प्रकाशनाइतका नजरेंत भरत नाहीं. प्रथमदर्शनींच बहिरंगावरून तो एखाद्या कापडाच्या गिरणीचा 'कॅटलॉग' किंवा 'सूव्हेनीर' सारखा वाटतो. एका मान्यवर अशा कला शिक्षण देणाऱ्या संस्थेचें हें वार्षिक ! त्याबद्दलच्या सजावटीच्या दृष्टीनें वाचकांच्या अपेक्षा उंचावलेल्या असल्यास आक्षेपार्ह असें कांहीं नसावें.

साहित्य विभागांत-सुरवातीलाच—स्कूल ऑफ आर्टच्या विविध विभागांतील विद्यार्थ्यांकडून चित्रकलेच्या शिक्षणासंबंधीं सूचना वजा विचार मागवून ते लेखमालेच्या रुपानें दिलेले आहेत; परंतु असे हे अपरिपक्व विचार—संपादक मंडळानें त्यांच्यावर कांहीं संस्कार केले असते आणि ते—अंकाच्या शेवटीं दिले असते तर बरें झालें असतें. 'रूपभेद' या वार्षिकाच्या तोलाचें ते वाटत नाहींत.

श्री. चिन्मुलगुंद, श्री गोंधळेकर, श्री शिरगांवकर यांचे लेख विशेष उल्लेखनीय वाटतात.

चित्रकलेचें चिकित्सक मार्मिक समीक्षण वृत्तपत्रें आणि नभोवाणी यांनी वारंवार केलें पाहिजे ही चिन्मुलगुंद यांची सूचना योग्य वाटते. एखाद्या शिल्पाचें किंवा तैलचित्राचें अनावरण कोण्या एका पुढाऱ्यानें केलें, कीं त्या पुढाऱ्याच्या भाषणासकट आणि फोटोसकट सर्व वृत्तांत साग्रसंगीत छापून येतो. परंतु हें शिल्प किंवा तैलचित्र करणाऱ्या कलावंताचा उल्लेख क्वचित् येतो. हा अन्याय दूर झाला पाहिजे.

श्री. शिरगांवकर यांनीं केलेलें आपल्या गुरुवर्यांचें पुण्य-स्मरण एका जुन्या आणि ध्येयनिष्ट काळांत नेऊन सोडतें.

-- गोपालन्

● ●

**थोरांच्या सहवासांत**

## टिळक दर्शन

श्री. गोविंद तळवलकरकृत टिळक दर्शन आकारानें लहान असलें तरी गुणानें मोठें आहे. लोकमान्यांचें व्यक्तिमत्व सागरासारखें विशाल होतें. आणि त्यांचें समग्र चरित्र एका बैठकींत वाचून त्यांच्या व्यक्तिमत्वासंबंधीं कांहीं निष्कर्ष काढणें सर्वसामान्य वाचकाच्या आवांक्याबाहेरचें काम आहे. त्यामुळें श्री. तळवलकर यानीं मोठ्या परिश्रमानें टिळक-चरित्रविषयक सर्व सामग्री अभ्यासून टिळकांच्या जीवनांतील विविध पैलू आणि बारीक-सारीक छटा ललितरम्य भाषेत वाचकांसमोर मोठ्या कौशल्यानें ठेवल्या आहेत. विशेषतः टिळकांचें ग्रंथप्रेम आणि जिज्ञासावृत्ति याबाबतींत तळवलकरांनीं केलेलं दिग्दर्शन नुसतें वाचनीयच नव्हे तर तरुण पिढीसमोर आदर्श म्हणून ठेवण्यासारखें आहे. विशेषतः शालेय मराठी पाठ्यपुस्तकांत यांतील एखादें प्रकरण अवश्य समाविष्ट करण्यासारखें आहे.

श्री. तळवलकरांनीं याच धर्तीवर म. गांधी विवेकानंद इत्यादि थोर पुरुषांचें जीवनदर्शन घडविण्याची कामगिरी अंगावर घ्यावी अशी सूचना.

— मधु कर्णिक

● ●

## साहित्य-स्वीकार

१ : कारवारचा काळूराम
लेखकः—भानू शिरधनकर
प्र. अभिनव प्रकाशन मुं. १२

२ : बालानंद (काव्य)
कविः—मनोहर दि. टेकाडे
प्र. पूजा प्रकाशन, नागपूर १

३ : पाताळलोकची अद्भुत यात्रा
लेखकः—भा. रा. भागवत
प्र. नाग विदर्भ प्रकाशन, अमरावती

४ : उद्धव
लेखकः—मंगेश पदकी
प्र. महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती

५ : आम्ही भगिरथाचे पुत्र
लेखकः—गो. नि. दांडेकर
प्र. महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती

६ : सिंहाचा मुखवटा
लेखकः - उमाकांत ठोंबरे
प्र. विदर्भ महारोगी सेवामंडळ, उमरावती

---

( पान ४९ वरून चालू )

ऐकूं येत होते. नंतर एक मलायी लोकगीत लावण्यांत आलें. शब्दच नव्हे तर सूरहि ओळखीचे वाटूं लागले. उत्तरेकडून येणाऱ्या मेघांचें वर्णन गीतांत होतें. उत्तरेला मलायी शब्द 'उतार' हा आहे. मेघमंडल हा संस्कृत शब्द जसाच्या तसा मलायींत आहे. उच्चार बंगाल्याप्रमाणें मेघोमंडल असा करतात इतकेंच. प्रो. झैनुल अबेदिन म्हणाले, 'आमच्या मलायींत दक्षिणेला दक्सिन आणि पश्चिमेला पक्सिन हे शब्द आहेत; स्वर्ग, देव हेहि शब्द आहेत. मृत्यू, मौत याला मलायींत माती. गप्पा खूप रंगल्या. रात्रीं १२ ला बोटीवर परतलों.

● ●

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## महाराष्ट्राचे समर्थ आणि सव्यसाची लेखक श्री पु. भा. भावे यांनीं

माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरें तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचे गुऱ्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल शि. ग. पाटील, अकोला यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीनें पैसे पाठविले जातील.

**शि. ग. पाटील**, अकोला (वऱ्हाड).

**प्रश्न—आचार्य विनोबा भावे मध्य प्रदेशांतील दरवडेखोरांचे हृदय परिवर्तन घडवून आणीत आहेत ही गोष्ट खरोखर कौतुकास्पद नव्हे काय?**

**उत्तर**—आचार्य भावे हिंदुस्थानच्या उत्तर सीमेवरील दरोडेखोरांचे हृदयपरिवर्तन घडवून आणतील तर ती गोष्ट खरोखर कौतुकास्पद ठरेल.

**नंदकुमार नारकर**, मुंबई.

**प्रश्न--मोठी माणसें बहुधा विनयी असतात; कां?**

**उत्तर**—मोठेपणाच्या भारानं तीं वांकलेली असतात.

**अ. गो. डोईजोडे**, टिळकचौक, सोलापूर.

**प्रश्न—स्त्रीशीं जेव्हां अनैतिक संबंध ठेविला जातो, तेव्हां ती स्त्री 'भ्रष्ट' म्हणून गणली जाते. पण संबंध ठेवणारा पुरुष तसा कां गणला जात नाहीं.'**

**उत्तर**—जें शुद्ध असतें तें भ्रष्ट होऊं शकतें, पण जें शुद्ध नसते ते भ्रष्ट होणाचा संभवच नाहीं.

**गो. ल. मोकाशी**, डोंबिवली.

**प्रश्न—आजच्या प्रगत समाजात स्त्री लाखों प्रेक्षकांच्या देखत चुंबन घेऊं शकते, ही गोष्ट स्त्रीला भूषणास्पद आहे काय?**

**उत्तर**—नाहीं. ही गोष्ट पुरुषाला भूषणास्पद आहे.

**अरविंद शंकर गद्रे**, पुणें ४.

**प्रश्न—विद्यार्थ्यांना शारीरिक ताडन करण्याचा अधिकार उत्तर प्रदेशांतील शिक्षकांना पुन्हां बहाल करण्यांत येणार आहे असें ऐकतों. हें बरोबर आहे काय?**

**उत्तर**—उत्तर प्रदेशांतील विद्यार्थ्यांनीं आपल्या शिक्षकाना "शारीरिक ताडन" करण्याचा जो सपाटा चालविला आहे, त्याला दुसरें कोणतें उत्तर आहे?

**जागेश्वर हरी पांडे** रामदास पेठ नागपूर.

**प्रश्न—अमेरिकेनें रशियावर हेरगिरी करण्यासाठीं विमान पाठविले हें चुकलें नाहीं का?**

**उत्तर**—विमान पाठविलें होतें हें कांहीं चुकलें नाहीं. विमान सांपडलें इथें सारें चुकलें.

**प्रश्न—अमेरिकन विमानामुळें कुश्चेव जसे चिडले तसे आमचे नेहरू कधीं चिडले असते का?**



**उत्तर**—ह्या प्रश्नाचें उत्तर आमचा सहलावर्षी मैत्रीचा प्रदेश पचविणाऱ्या चौ-एन्-लायला विचारा!

**प्रश्न—कम्युनिस्टांचे नेते कुश्चेव हे शरीरानें भले ऐसपैस दिसतात व त्यांचे पोटही सुटलेले दिसते. असे का?**

**उत्तर**—कष्टकऱ्यांच्या कष्टानें पुढाऱ्यांच्या पोटाचा प्रश्न व त्यांचे पोटहि सुटव असतें.

**लक्ष्मण केशव आपटे**, वरुणतीर्थ वेस, कोल्हापूर.

**प्रश्न--अश्लिल चित्रें व वाङ्मय यांचा नंगा नाच हल्लीं मासिकांतून, वृत्तपत्रांतून, भाषणांतून व चित्रपटांतून राजरोस बोकाळलेला दिसत आहे. ह्याला कांहीं पायबंद असावा असें आपणास वाटतें काय?**

**उत्तर**—असें आम्हांस वाटून उपयोग काय? असें तुम्हांस वाटलें पाहिजे.

**प्रश्न—संपादकीय विभागांतहि वशिलेबाजी चालते कांय!**

**उत्तर**- ह्या चांचणी प्रश्नाचा उद्देश काय?

**प्रश्न—सर्व जातींत सुधारणा झाल्या होत आहेत—संपादकांची जात केव्हां सुधारणार!**

**उत्तर**—वाचकांची जात सुधारल्यावर!








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

**आर. जी. आळशी,** अमरावती, (वऱ्हाड)

**प्रश्न--बायकांना बुरखे घालण्याच्या पद्धतीपासून कुठला फायदा आहे ?**

**उत्तर--**डोळ्यांना कष्ट देणारी बरीचशी कुरूपता बुरख्यामुळें झांकली जाते, हा बुरखा-पद्धतीपासून होणारा फार मोठा लाभ म्हटला पाहिजे.

**प्रश्न--पुरुष आणि बायका ह्यांच्या पोषाखांत गेल्या कांहीं वर्षांत झालेला बदल काय दाखवितो ?**

**उत्तर--**बायकांच्या पोषाखांतील बदल त्यांची अंगे दाखवितो. व पुरुषांच्या पोषाखांतील बदल त्यांची व्यंगे झांकतो.

**प्रश्न--चेहेरे भडकपणे रंगविण्याची पद्धत आजकालच्या बायकांत बरीच बोकाळली आहे. त्यांचे ते रंगविलेले चेहेरे आपणांस कसे काय वाटतात ?**

**उत्तर--**रंग चढविलेला असेल तेव्हां दिवाळींत रंगविलेल्या मारवाडी दुकाना-सारखे व रंग उडालेला असेल, तेव्हां पडक्या जुनाट भिंताडासारखे.

**प्रश्न--रंगभूमीवर स्त्रियांची कामें स्त्रियांनीं करण्यांत जास्त कला आहे कीं स्त्रियांची कामें पुरुषांनीं करण्यांत जास्त कला आहे ?**

**उत्तर--**कुत्र्यानें कुत्र्यासारखे ओरडण्यांत जास्त कला आहे, कीं माणसानें कुत्र्यासारखे ओरडण्यांत जास्त कला आहे ?

**रा. स. धोंड,** वेळगांव.

**प्रश्न--काळे, ढवळे, पांढरे, ह्यासारखीं रंगीबेरंगी चमत्कारिक आडनांवे महाराष्ट्रांत कशी आलीं ?**

**उत्तर--**महाराष्ट्रांतच नव्हे तर विलायतेंत सुद्धां अशीं रंगीबेरंगी आडनांवें आहेत उदा० Black, White, Brown, इत्यादि. तुमच्या "धोंड" ह्या चमत्कारिक आडनांवाशीं जवळचा नाते-संबंध सांगणारे "stone" हे आडनांव देखील इंग्रजींत आहे.

**जगन्नाथ बाळकृष्ण जगदाळे,** वर्धा

**प्रश्न--परिक्षेंत थोडी वेगळी प्रश्न-पत्रिका आली तरी आजकालचे विद्यार्थी ओरडा करतात ह्याला काय करावें ?**

**उत्तर--**प्रश्नपत्रिका काढण्याचे काम विद्यार्थ्यांना सांगावें व मास्तरलोकांनीं परीक्षेला बसावें.

**मा. कृ. खेर,** जबलपूर

**प्रश्न-जगाची लोकसंख्या झपाट्यानें वाढत आहे. परंतु पृथ्वीचे क्षेत्रफळ वाढण्याचा कांहींच संभव नाहीं. तेव्हां ह्या वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न तडकाफडकी सोडविण्याची कांहीं उपाय-योजना जगांतील विचारवंतांनीं शोधून काढावयास नको काय ?**

**उत्तर--**तशी उपाययोजना जगांतील विचारवंतांनीं केव्हांच शोधून काढली आहे. वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न तडकाफडकी सोडविणाऱ्या त्या रामबाण उपाययोजनेचे नांव "अॅटमबॉम्ब !"

**कमल भांडारकर,** इंदोर.

**प्रश्न--बायका पिकल्या आणि स्वतंत्र झाल्या तर त्या शिकलेल्या नव्या बायका मोठ्या माणसांची पिढीच्या पिढी निर्माण करूं शकतील, हें अनेक बथ्थड पुरुषांना कां कळत नाहीं ?**

**उत्तर--टिळक, रानडे, गोखले, आगरकर, गडकरी, सावरकर, बालगंधर्व** इत्यादि मोठ्या माणसांची आकाराला आणणाऱ्या जुन्या बायका त्या अर्थानें शिकलेल्या होत्या किंवा कसे असा प्रश्न साऱ्या "बथ्थड" पुरुषांना पडलेला आहे !

**श्री. गो. पळसुले,** पुणें.

**प्रश्न--अलीकडे आपले सरकार साहित्यिकांना त्यांच्या ग्रथासाठीं बक्षिसे देत असतें ही फार उत्तम गोष्ट आहे. परंतु ही बक्षिसे पुष्कळदा योग्य माणसाना मिळत नाहींत. एरवी "गाथा-सप्तशती" "सह्याद्रि" ह्या सारखे असामान्य ग्रंथ लिहिणाऱ्या स. आ. जोगळेकरासारख्या मोठ्या लेखकाला एखादे मोठे बक्षिस मिळावयास नको होते काय ?**

**उत्तर--**जोगळेकरांना एखादे मोठे बक्षिस मिळूं शकलें नाहीं, ह्यांतच त्यांचा मोठेपणा आहे.

**खं. स. जाधव,** माहिम-मुंबई.

**प्रश्न--दारूबंदीचे धोरण पूर्णपणे अयशस्वी झाले आहे हे आमच्या नेत्याना ठाऊक असतांहि दारूबंदी चालू ठेवण्याचा आग्रह का ?**

**उत्तर--**दारूपेक्षांहि दारूबंदीची धुंदी अधिक मोठी आहे.

**रंगनाथ कांबळें,** कामठी.

**प्रश्न--रशियन व चिनी गिर्यारोहक "गौरीशंकरा" च्या दिशेनें कां निघाले होते ?**

**उत्तर--**लाल पिवळे पतंग उडविण्यासाठीं.

**रजनी दिघे,** (खार).

**प्रश्न--बायकांनीं पुरुषांसारखे कपडे केले तर त्यांत काय बिघडते ? विजार, शर्ट घालणाऱ्या बायकोचा नवऱ्याला राग कां यावा ?**

**उत्तर--**आणि पुरुषांनीं बायकांसारखे कपडे केले तर त्यांत तरी काय बिघडले ? साडीचोळी घालणाऱ्या नवऱ्याचा त्याच्या बायकोला राग येण्याचे कारण काय ?

**त्रिं. प. दंडवते,** लष्कर, ग्वाल्हेर

**प्रश्न--पूज्य विनोबाजी भावे हे मध्य प्रदेशांतील दरोडेखोरांना दरोडेखोर न म्हणतां बंडखोर म्हणून संबोधणार आहेत. आतां ते बंडखोरांना कोणते विशेषण लावतील !**

**उत्तर--**त्यांना अर्थातच ते 'दरोडेखोर' म्हणून संबोधतील !

● ●


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका







• शुष्क साहित्य परिसंवाद • ठाण्याचें 'भानगडी' साहित्य-संमेलन • शिखर परिषदेचा बोजवारा • रशियाचा विक्रम

## शुष्क साहित्यिक परिसंवाद

गेल्या महिन्यांत मुंबई मराठी साहित्य संघाच्या विद्यमानें साहित्यिक विषयांवर दोन दिवस परिसंवाद घडवून आणण्यांत आले होते. ही एक मोठी विस्मयकारक घटना घडली होती. साहित्यसंघ म्हणजे नाटक कंपनी असें जें एक विचित्र समीकरण गेले कांहीं वर्षें मुंबईकरांना ज्ञात होतें त्यामुळें 'सीझन' बंद होतां होतां जरि हे परिसंवाद आंखले गेले तरी त्यासाठीं तब्बल दोन दिवस खर्ची घालण्यांत आले हे मराठी साहित्याचें भाग्यच. गेले कांहीं वर्षें फक्त कांहीं तुरळक व्याख्यानांपलीकडे साहित्य-संघातर्फे भरघोस वाङ्मयीन कार्यक्रम आंखले गेले नसल्यामुळें प्रस्तुत परिसंवादांस रसिक श्रोते गर्दी करणार अशी अपेक्षा होती. पण ह्या कार्यक्रमाची जाहिरात नाटकाइतकी 'आगाऊ' व आगामी न केली गेल्यामुळें तसेंच अभ्यागतांचें आगमनहि अनिश्चित असल्यामुळें एकंदरीत कार्यक्रम थोडासा असंबद्धच झाला. तसेंच परिसंवादाची बैठक एखाद्या वर्तुळ परिषदेसारखी रंगमंचावर केली असल्यामुळें अनौपचारिक बैठकीचें स्वरूपच या परिसंवादांना आलें आणि प्रतिष्ठित साहित्यिक आणि उपेक्षित प्रेक्षक यांत अंतर पडून एखाद्या नाटकासारखें स्वरूप एकंदर कार्यक्रमाला आलें. ही अनौपचारिकता संघ-कार्यकर्त्यांनीं व साहित्यिकांनी कसून पाळली कारण कांहीं राखीव साहित्यिक मंचावरच्या मागल्या रिकाम्या खुर्च्यांत जांभया देतांना व अधूनमधून आंतबाहेर करतांना प्रेक्षकांना दिसत होते. परिसंवादांचे विषय प्रेक्षकांच्या जिव्हाळ्याचे नसल्यामुळें उपस्थिति तुरळकच होती. फक्त मधूनमधून बाहेरील आरास पाहून महाराष्ट्रराज्य [illegible] कार्यक्रम पाहाण्यासाठीं आंत सहकुटुंब सहपरिवार येणारे प्रेक्षक मुक्तद्वार प्रवेशामुळें आंतल्या रिकाम्या खुर्च्यांवर स्थानापन्न होतात न होतात तोंच महामहोपाध्यायांच्या एखाद्या कोटीनें अगर जाड्या चष्म्याच्या चर्चिकाच्या धीरगंभीर आवाजानें एखादें पोर गळा काढून रडत असे व त्यानें बावरून सर्व कुटुंब बाहेर पडत असे. अशीच प्रेक्षकांची उपस्थिति एकंदर कार्यक्रमास लाभली.

'साहित्य संस्थांचें भावी स्वरूप' ह्या विषयावर झालेला परिसंवाद साहित्य, साहित्यसंस्था व स्वरूप या शब्दांचा शब्दच्छल करण्यांतच विशेष खर्ची पडला. ललितेतर साहित्याचा महत्त्वाचा व संपन्नतेचा पाठ-पुरावा महामहोपाध्याय पोतदारांनीं केला, ढवळ्यांनीं साहित्यसंस्थांमधली कार्यकर्त्यांची मक्तेदारी नाहींशी करावी, के. नारायण काळ्यांनीं संस्थाप्रतिनिधित्वाचा पुरस्कार केला, तर कुणीतरी साहित्य संस्थांनीं आतां संशोधनाचें काम थांबवून वाङ्मयीन अभि-रुचीचें कार्य पत्करावें असें सांगितलें, तर देशपांड्यांनीं साहित्यसंस्थांचे निष्क्रीय जीवन अनुपयुक्त असल्याचें सांगितलें, सारांश, चर्चेला मध्यबिंदु नसल्याकारणानें प्रत्येक बुजुर्गानें आपापले विस्कळित विचार अप्र-स्तुतपणें मांडून चर्चेत भाग घेतल्याचें श्रेय मिळवलें.

दुसरा परिसंवाद 'साहित्याचा सरकारी पुरस्कार' ह्या विषयावर भोजनोत्तर सुरू झाला. ह्या परिसंवादांत प्रकाशक, परीक्षक, समीक्षक, पुरस्कार मिळालेले साहित्यिक, पुरस्कार न मिळालेले साहित्यिक इत्यादि संबंधित सदस्यांनीं भाग घेतला होता. ही चर्चा मोकळी झाली असें कांहीं म्हणतां येणार नाहीं, कारण समोर बसलेल्या भिन्न व्यावसायिक स्नेह्यांना न दुखवतां किंचित् स्पष्टपणें आपापलें दुखणें सांगण्याची समंजस वृत्ती एकंदर चर्चिकांत दिसली. सरकार आपलेंच आहे व तें सूज्ञ आहे फक्त नोकरशाहीच बेजबाबदार असते असें कांहींनीं बोलून दाखविलें. कांहींनीं सापेक्ष लेखन साहित्यि-कांनीं करूं नये असें सांगितलें तर कांहींनी स्वतंत्र व मान्यवर साहित्यिक संस्थांच्याच मध्यस्थीनें साहित्याची गटवारी व साहित्यि-कांची प्रतवारी करावी असें सुचविलें. एका चर्चिकानें आपल्या स्वतंत्र दृष्टिकोनाची पद्धत सांगतांना नवसाहित्यिकांच्या नवजात कृतीचें कौडकौतुक न करतां सरकारनें कृतकृत्य साहित्यिकांना ऐहिक व आत्मिक उत्तेजन देण्यासाठीं प्रत्येकाला एकदांच पण भरघोस पारितोषिक द्यावें असें समोरच्या 'माइकला' बजावून सांगितलें. ह्याशिवाय ह्या परिसंवादास अस्पर्शित ठरणारे अनेक अप्रस्तुत मुद्देहि मध्येंच जाग आलेल्या साहित्यिकांनीं मांडले. त्यांत आकाशवाणीचा उद्धार, चेक घरां पोचता कर-ण्याचा सल्ला; (कारण वाटेंत लूटमार होण्याचा संभव असतो) सरकारी योजनांना पुरस्कृत करणारें 'रेडिमेड' साहित्य, प्रकाश-कांना उत्तेजन देण्याची योजना इत्यादि आपापलीं जुनीं खुपणीं मांडली. चर्चेचें तात्पर्य झोंपी गेलेल्या प्रेक्षकांना जसें कळलें नाहीं तसें चर्चेचा निष्कर्ष झोंप आलेल्या चर्चिकांनाहि काढतां आला नाहीं हें मात्र खरें.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दुसऱ्या दिवशीं ‘साहित्यिक संस्थांची व साहित्यविषयक नियतकालिकें ह्याबद्दल अपेक्षा’ ह्या विषयावर परिसंवाद झाला. ह्या चर्चेत माजी व आजी संपादकांनी आपापलीं गाऱ्हाणीं व अनुभव विशेष सांगितले. विशेषतः बहुतेकांचा रोख, सरकारी उपेक्षावृत्ति व वाचकीय असहानुभूति ह्यांवरच होता. साहित्यविषयक नियतकालिकांचे वाचक जास्त समंजस व सुशिक्षित असल्यामुळें त्या नियतकालिकांचा खप कमी असतांनासुद्धां सरकारी जाहिराती त्यांना मिळाव्या, असें केल्यानें सरकारची प्रसिद्धी तज्ञांबरोबर सूज्ञांमध्येंहि होईल. तसेंच ह्या नियतकालिकांच्या प्रती सरकारनें घाऊक विकत घेऊन प्रसृत कराव्या म्हणजे (सरकारी जाहिराती व) वाङ्मयाचा प्रसार करणें सुलभ होईल. एका माजी संपादकानें तर स्वतःच संपादकाच्या अव्यवहार्य धोरणावर टीका करून लेखन-दानाची नामी शक्कल सुचवली.

अशा तऱ्हेनें साहित्यसंघानें हे तीन वैचित्र्यपूर्ण परिसंवाद घडवून आपल्या साहित्यिक कार्यक्रमाची सांगता केली. हे तीन विषय साहित्य या शब्दाशीं निगडित होते म्हणूनच त्यांना प्रस्तुत म्हणतां येईल. नाहींपेक्षां असले परिसंवाद चहा-चिवडा-चिरुट यांच्या भरपूर पुरवठ्यांत एखाद्या मातब्बर साहित्य रसिकाच्या. दिवाणखान्यांतच जास्त रंगले असते. परिसंवाद प्रगटपणें भरवतांना त्यांत भाग घेणाऱ्या चर्चिकांच्या ठायीं विषयाचा सखोल अभ्यास निदान किमानपक्षीं गांभीर्य अपेक्षिले जातें. चर्चा अनौपचारिक ठरवली म्हणजे त्यांत विस्कळीतपणा व अप्रस्तुतता कशी येऊं शकते याचें प्रत्यंतर उत्सुक श्रोत्यांना ह्या परिसंवादानीं दाखवलें. चर्चेत पक्षोपपक्षीय वाद संभवनीय असलें तरि अध्यक्षानें आपल्या सुकानावर लक्ष ठेवून वाहत जाणारे तारूं वेळींच सांवरले तर चर्चेला रंगत राहाते. त्या दृष्टीनें हे परिसंवाद म्हणजे साहित्यसंघांत कधींमधीं होणाऱ्या गल्लाभरू नामवंत नटांच्या कंत्राटी नाटकांसारखे बेचव व संघभावहीन झाले.

मराठी साहित्याच्या प्रांतांत आजकाल अनेक पंथांचें व मतांचें अराजक माजलेलें दिसतें. त्याच्या मुळाशीं महात्मतेपेक्षां असहिष्णुताच जास्त संभवते. आपलें व आपल्या पंथाचें तें श्रेष्ठ व इतरांचें तें प्रतिगामी ह्या वृत्तीनें नवजीर्ण, पुरोगामी प्रतिगामी, कला-जीवन सृजन-नियोजन इत्यादि पक्ष उभारले जातात आणि नेत्यांच्या उपयुक्ततेनुसार त्या त्या पक्षांत एकेश्वरी वा सर्वेश्वरी शिष्यशाखा तयार होते आणि मग आपलीं खाजगी गाऱ्हाणीं वेशीवर टांगण्यासाठीं नवीन परिभाषेंत प्रतिपक्षावर रकाने भरून भरून हल्ले चढवले जातात. आजकालच्या मराठी साहित्याचें धुरीणत्व बहुशः फुरसत असणाऱ्या प्राध्यापकवर्गाकडे गेलें असल्यामुळें पश्चिमेच्या अस्मानांत खुलणारे रंग व उठणारे तरंग नकलून शारदादेवीच्या ऋजु सौन्दर्यमूर्तीचें चित्रण नवकलेच्या बीभत्स स्वरूपांत प्रगट होतांना आढळतें. त्यामुळें समीक्षणाची मूल्यें, अवतरणें व परिभाषा तसेंच सृजनातील संस्कृति व संकेत ह्यांना पार नवें वळण लावून मराठी वाचकाला तडीपार नेण्याचा चंग बांधला जात असल्याचें आढळतें.

**दीपावली** च्या पुढील अंकांत येणाऱ्या वैशिष्ट्यपूर्ण लेखांची ही झलक

(१) ‘लिओ लिओनी’ एका चतुरस्र चित्रकाराच्या जीवनाची ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनी करून दिलेली वेधक ओळख.

(२) पांच हजार वर्षांपूर्वील गुर्जर भूमींतील एका मृतांच्या नगरीचा रम्य–भीषण इतिहास.

(३) अनंत काणेकर यांनीं केलेलें रुपेरी उन्हांतील पाचूच्या बेटांतलें अद्‌भुत प्रवास वर्णन.

•नामवंत साहित्यिकांच्या कथा, ललितनिबंध, कविता इत्यादि मनोहारी साहित्य.

शिवाय

वेगळें वेधक मुखपृष्ठ, ‘भारताचे भाग्य विधाते’ या रंगीत चित्रमालेची ३ री भेट

नेहमींचीं सर्व सदरें, चित्रें, हास्यचित्रें, बिंगचित्रें—

एजंटांनीं १० तारखेच्या आंत आपल्या प्रतींची मागणी करावी.

वार्षिक वर्गणी रु. १२॥ ★ दलाल आर्ट स्टुडिओ, ४१/४३ केनेडी ब्रीज–मुंबई ४.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पौर्वात्य सुसंस्कृत व रोचक पद्धतीनें वाचकाला रंजवून ज्ञानी करण्यापेक्षां पाश्चिमात्य (ॲरिस्टॉटलप्रणीत) रेचक पद्धतीनें बेसावध वाचकाला अचानक संज्ञाप्रवाहांत लोटून देण्यांतच आजचे प्रथितयश साहित्यिक इति-कर्तव्यता मानीत असतात. सामान्य वाचकाचें यामुळेंच, साहित्यिक ह्या शब्दाबद्दल व व्यक्ति-बद्दल मत फारसें चांगलें राहिलेलें नाहीं. ज्या वाङ्मयांत आपल्या समाजाचें, त्यांत वावर-णाऱ्या व्यक्तींचें किंवा चिरस्थायी जीवन अगर नीतिमूल्यांचें प्रतिबिंब दिसत नाहीं तें वाङ्मय आकर्षक व उत्तान वेष्टनांनीं अव-गुंठलें तरी तो तें हातांतहि धरूं इच्छित नाहीं. ह्या त्याच्या दृढमूल वृत्तीमुळें नव्या वाङ्मयाबद्दल त्याला आस्था वाटत नाहीं. वाङ्मयाच्या चढत्या शुल्कामुळें तें विकत घेण्याची त्याची कुवत आधींच कमी. त्यांत असलें असत्याधिष्ठित व वैचारिक संक्रमण निर्माण करणारें नवसाहित्य त्याला त्यांतल्या फाजील संज्ञाप्रवाहामुळें अथवा अमहाराष्ट्रीय भाषाशैलीमुळें अस्पृश्य वाटूं लागलें तर त्याचा दोष त्याच्या माथीं मारून साहित्यिकांनी, समीक्षकांनी व प्रकाश-कांनी एकच गिल्ला करावा हे कसें सयुक्तिक ठरतें. आजकालच्या बहुसंख्य वाच-कांना कथेपेक्षां गोष्ट आवडते, नवकाव्यापेक्षां गीत आवडतें आणि बोजड शैलींतल्या समीक्षणापेक्षां बाळबोध भाषेंतले निबंध आवडतात हें जाणून त्यांच्यासाठीं जोपर्यंत वाङ्मय निर्माण होणार नसेल तर बुजुर्ग साहित्यिकांना असल्याच अनास्थेचा अनुभव येत राहील. भावी मराठी साहित्य, समीक्षण व चर्चा वाचकांच्या ह्या अनुभवसिद्ध पातळी-वर आणण्याचे प्रयत्न जर करण्यांत आले तरच मराठी प्रकाशनाच्या व्यवसायाला बरकत येईल. हें सांगणें आज प्रस्तुत ठरावें.

### ठाण्याचें 'भानगडी' साहित्यसंमेलन

ठाणेंकरांच्या विशिष्ट प्रज्ञेची प्रसिद्धि मुंबईच्या किंबहुना महाराष्ट्रीय जनतेच्या परिचयाची आहेच. त्यामुळें तिथें साहित्य-सम्मेलन भरणार हें कळतांच अनेकांच्या (विशेषतः साहित्यपरिषदेच्या कार्यकर्त्यांच्या) पोटांत गोळा उठला होताच. त्यात संम्मेलना-पूर्वी स्थानिक मतप्रण[illegible]ताच्या अट्टहासानें मानापमाना[illegible] जे अनेक प्रयोग झाले त्याची झळ चिंतामणराव देशमुख व यशवंतराव चव्हाणांना दूरान्वयानें लागून त्यांनीं आपलें शुभशकुनी सहकार्य या सम्मेल-नास साभारपूर्वक नाकारलें ही त्यांच्या मुत्सद्देगिरीची साक्ष होय. प्रस्तुत साहित्य-सम्मेलन हें नवीन महाराष्ट्रराज्याच्या आगमनप्रसंगींच भरणार होतें त्यामुळें अनेक महाराष्ट्रीय रसिकांच्या मनांत ह्या सम्मेलना-बद्दल अपूर्व उत्साह व अपेक्षा होत्या. पण ठाणेकरांनीं आपल्या स्वतंत्र कल्पनाशक्तीनें ह्या सम्मेलनाला निराळेंच वैशिष्ट्य प्राप्त करून देण्याचें ठरवलें होतें व त्याची प्रसादचिन्हें दिसतांच साहित्यिक व प्रतिनिधी ह्या दोघांनींही आपले बेत बदलले. ठाण्याची वास्तुही इतर कारणाप्रमाणें साहित्याला पोषक होती ह्याची साक्ष महाराष्ट्र सारस्वतानें दिलेली आहेच. तरिपण नांवापलिकडे साहि-त्याचा स्पर्श ह्या सम्मेलनाला होऊं नये ह्याची खबरदारी कार्यकर्त्यांनी आगाऊ घेतल्यामुळें सम्मेलन त्या प्रकारें स्मरणीय ठरलें. ठाण्याला पाण्याचें दुर्भिक्ष असूनसुद्धां कार्यकर्त्यांनीं आपल्या वागणुकीनें हजर असलेल्या प्रतिनिधींना आपली पाणीदार वृत्तीची चुणुक दाखवली व माजी आणि आजी अध्यक्षांच्या तोंडचें पाणी पळवलें. त्यामुळें अध्यक्षांचें विचारपरिप्लुत भाषण, परिसंवाद, ठराव व चर्चा ही सर्व शुष्कपणें पार पडलीं. प्रतिनिधींचा वेळ फुकट जाऊं नये किंबहुना त्यांची आवड सोयीस्करपणें पुरवावी या हेतूनें एकाचवेळीं वैचारिक व करमणुकीचे कार्यक्रम भावेनगराच्या परि-सरांत चालू ठेवले होते. ह्या विशिष्ट कार्यक्रमपद्धतीनें लक्ष साहित्यिक कार्यक्रमांना सक्तीनें हजर न राहण्याची प्रतिनिधींना जशी सवलत मिळाली तशीच मुक्त करमणुकीच्या कार्यक्रमांची रंगत बिघडू नये म्हणूनही ही सोय होती. शिवाय नेहमीं चर्चेचे कार्यक्रम सम्मेलनांत भाऊगर्दीनें उरकले जातात त्यांनाहि पूर्णपणें अवसर मिळावा हीहि योजना आपोआपच साधली गेली. निवास, भोजन व कार्यक्रमस्थान ह्यामध्यें राखलेल्या अंतरामुळें अनेकांची गैरसोय झाली तशी कांहींची सोयहि झाली. सम्मेलनाच्या निमित्तानें परगांवाहून आलेल्या प्रतिनिधींना आपापले खाजगी कार्यक्रम उरकणें त्यामुळें सुलभ झालें. ठाणेकरांना या सम्मेलनाच्या निमित्तानें एक नाट्यमहोत्सव पाहावयला मिळून त्यांचे पैसे वसूल झाले एवढेंच नव्हे तर मवाळ साहित्यिक चर्चेनें व भाषणांनीं त्यांच्या क्रांतिकारक विचारशक्तीला गंज चढूं नये यासाठीं ही करमणुकीची योजना सयुक्तिक व उपकारकच होती. ठाण्याच्या


# डॉ क ट र्स

**डेन-टॉनिक व ऑन्टान्सिल**

(टीथिंग पिल्स) (टॉन्सिल्सवर)

**विश्वासानें व मोठ्या कौतुकानें वापरण्यास सांगतात.**
**कारण त्यापासून होणारे फायदे अनुभवास येतात.**

बाराक्षार व होमिओ औषधे माफक दरांत मिळतात

# हो मि ओ लॅ बो रे ट री

**राममोहन हायस्कूलजवळ, १७८, चर्नी रोड, गिरगांव, मुंबई ४.**





अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सम्मेलनामुळें प्रतिनिधींनीं एवढा धसका घेतला कीं त्यांच्यावर झालेल्या मानसिक व शारिरीक परिणामांवर उपचार करण्यासाठीं स्थानिक वैदूंना रविवारींही दवाखाने उघडे ठेवावे लागले अशी बातमी आहे. पुढील सम्मेलनाचें आमंत्रण प्रथेप्रमाणें सांगता समारंभाच्या प्रसंगीं देण्यास भावी आमंत्रक कचरले ह्याचेंही कारण स्थानिक उष्म वातावरणाची झळ हें असावें.

— सारस्वत



## शिखर परिषदेचा बोजवारा

१४ मे १९६० रोजीं पॅरीस येथें भरलेल्या बड्या राष्ट्रांच्या शिखर परिषदेचा अखेर बोजवारा उडाला. या प्रकरणांत अखेर रशियाचीच बाजू उजवी ठरली. अमेरिकेच्या इतिहासांत अमेरिकन अध्यक्षावर एवढा मानहानीचा प्रसंग कधींच आला नसेल. यू. २, विमानाच्या टेहळणीबाबत अमेरिकन सरकारतर्फे जें निवेदन करण्यांत आलें त्यांत अमेरिकेची लंगडी बाजू ठळकपणें जगाच्या समोर आली. वास्तविक पहातां अशा प्रतिकूल अवस्थेंत शिखर परिषदेचें भवितव्य जवळ जवळ ठरल्यासारखेंच होतें. तथापि अमेरिकन हेरगिरीचें रशिया एवढें मोठें भांडवल करून शिखर परिषद उधळून लावील अशी खुद्द अमेरिकेलाहि कल्पना नव्हती. पण जागतिक राजकारणांत अमेरिकेचा जाहीर मुखभंग करण्याची ही सुवर्णसंधि रशियानें न घालवतां अमेरिकेला अक्षरशः पेचांत पकडलें आणि शिखर परिषदेला अक्षरशः सुरुंग लावला. टेहळ्या विमानाची घटना म्हणजे रशियाच्या दृष्टीनें एक अनुकूल घटनाच घडली. या घटनेचा उपयोग क्रुश्चेव्हनें प्रचारासाठीं आणि अंतिम अमेरिकेवर राजकीय विजय मिळविण्यांत केला.

मात्र हें विमान प्रकरण घडलेलें असतांना क्रुश्चेव शिखर परिषदेला उपस्थित कां राहिला असा एक प्रश्न उभा राहतो. सध्यां रशियातील अंतर्गत राजकीय प्रवाहाचा एक अटळ परिणाम म्हणून क्रुश्चेवला ही तडफदार आणि खंबीर भूमिका घ्यावी लागली असावी असा राजकीय निरीक्षकांचा तर्क आहे. दुसरें कारण असें कीं फ्रान्स अमेरिका आणि इंग्लंड यांचे मैत्रीचें आसन आतां डळमळीत झालें आहे तें पार दुभंगलें म्हणजे शिखर परिदेंत रशियाला वरचष्मा गाजवतां येईल व त्याकरितां शिखर परिषद लांबणीवर टाकण्याचा क्रुश्चेवनें हा एक डाव टाकला असावा असा तर्क.

वास्तविक पाहातां हेरगिरी करणारीं विमानें शत्रुराष्ट्राकडून पाडण्यांत आलीं तर ती घटना दोन्हीं राष्ट्रांकडून नेहमीं गुप्त राखण्यांत येते. अशा परिस्थितींत हा नेहमींचा राजकीय संकेत न पाळतां या घटनेला रशियानें एवढी प्रसिद्धी कां द्यावी ?

—कारण त्यामुळें जागतिक शांततेसाठीं चाललेल्या प्रयत्नांत रशियाची यावेळची भूमिका साऱ्या जगाला संशयास्पद वाटण्यासारखी परिस्थिति रशियन मुत्सद्यांनीं निर्माण केली आहे हें निर्विवाद !



## रशियाचा विक्रम

गेल्या महिन्यांत रशियानें अंतरिक्षांत आणखी एक उपग्रह सोडला आणि साऱ्या जगाला आश्चर्यचकित केलें. रशियाचें हें नवें धाडस म्हणजे एका वर्षाच्या आंतच मानव अंतरिक्षांत भ्रमण करून परत स्वगृहीं सुरक्षित येईल असा विश्वास निर्माण झाला आहे. या नव्या उपग्रहाचें वजन २॥ टन असून, या नमुन्यानुसार बनविण्यांत येणाऱ्या उपग्रहांत यापुढें जेवणखाण, ऑक्सीजन, करमणुकीचीं साधनें, छायाचित्रें घेण्याचीं उपकरणें इत्यादि सोयी असतील. रशियाच्या या नव्या उपग्रहांत एक बनावट माणूस ठेवण्यांत आला आहे. थोड्याच काळांत रशिया असा एखादा जिवंत मानव अंतरिक्षांत पाठविण्याचा संभव आहे.

या नव्या उपग्रहांत 'रेडियो ट्रान्समिटर' बसविण्यांत आला असून त्यासाठीं लागणारी विद्युतशक्ति अणुशक्तीच्या बॅटरींच्या साहाय्यानें पुरविण्यांत आली आहे. हा उपग्रह प्रत्येक ९१ मिनिटाला पृथ्वीला २०० मैलांपासून दूरच्या अंतरावर फेरी घालील आणि त्याचें नियंत्रण पृथ्वीवरून शक्य होईल.

रशियाचा हा नवा प्रयोग म्हणजे मानवाच्या महत्वाकांक्षेचा नवा विजय. त्यामुळें सर्व जागतिक शास्त्रज्ञ या प्रयोगाकडे आशेनें पाहात आहेत.

— पिनाकि

( पान ४ वरून )

जीवनाचें सूत्र आहे. त्यांना मध्यमाचा तिरस्कार आहे. अपूर्वाचा त्यांना सतत ध्यास आहे, सुवर्णमध्य अगर तडजोड त्यांच्या प्रकृतीला खपत नाहीं. अशी तडजोड त्यांना खपती तर ते केव्हांच मुंबई राज्याचे मंत्री झाले असते. पण जें कोणाचीहि भीडभाड न ठेवतां आपल्या मनाला योग्य वाटेल तें बिनदिक्कतपणें मराठमोळ्या शब्दांत सांगतात हा त्यांचा धर्म आहे. त्यामुळें ते आज ज्याला डोकीवर घेऊन नाचतील त्याला पदतळीं तुडवतील आणि काल ज्याला पदतळीं तुडवीत होते त्याला मस्तकीं धारण करतील. पण दुटप्पीपणा आणि व्यवहारचातुर्य यांची ज्यांत कसोटी लागते अशा राजकारणांत अत्र्यांचें प्यादें कदाचित् मागें पडण्याचा संभव आहे.

—पण त्यामुळें अत्रे स्वस्थ बसतील याची शाश्वति नाहीं. कारण धडपड हा त्यांचा स्थायीभाव आहे. अजून त्यांच्यापुढें पुष्कळ कार्य आहे. मृतवत् रंगभूमीला संजीवनी देण्यासाठीं सामर्थ्यवान् नाट्यकृति अत्र्यांच्याच हातून निर्माण व्हायच्या आहेत. महाराष्ट्रांतील लहान मुलांना हंसवण्या खेळवण्याची ताकद अत्र्यांच्याच लेखणींत आहे तिचाहि अजून उपयोग व्हायचाय !

आणि फिनीक्स पक्षाप्रमाणें राखेंतून जिवंत होण्याचा प्रकृतिधर्मी आत्रेय व्यक्तिमत्व पुनरपि मराठी देश गाजवील यांत शंकाच नाहीं.

— पिनाकि

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस ६. केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



लवकरच प्रसिद्ध होत आहे !

# चित्रांजली

(अर्थात भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें)

गेलें वर्षभर दीपावली मासिकांतून प्रसिद्ध झालेली 'भारतीय संस्कृतीचीं प्रतिकें' ही रंगीत चित्रमाला आतां पुस्तक रूपानें प्रसिद्ध होत आहे. त्यांत बारा रंगीत चित्रें, दुर्मिळ अशा अनेक शिल्पांच्या रेखानुकृति, आणि प्रत्येक चित्रावरती माहितीपूर्ण ललितभाष्य.

साईज डेमी, मोहोरेदार कागद, आर्ट पेपरवरील चित्रछपाई इत्यादि....

अधिक माहितीसाठीं पुढील अंक पाहा.

प्रकाशक : दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, कॅनेडी ब्रिज, मुंबई नं. ४.

विवाह प्रसंगीं भेट देण्यायोग्य हिंदी व मराठी भाषांमधील अनुपम ठेवा -- असें




# शृंगार नायिका

लेखक : स. आ. जोगळेकर, 'सह्याद्रि'कर्ते
चित्रें : दीनानाथ दलाल

हें पुस्तकच निवडा

- पुस्तकाचा आकार १०" × १३"
- पृष्ठ संख्या ८४
- कागदप्रकार मोहरेदार
- बांधणी जाड पुठ्ठा
- मूल्य : रु. १२॥ + १॥ पोस्टेज
- माउंटवर चिकटविलेलीं, फोटो ऑफसेटनें छापलेलीं अनेकरंगी नयनमनोहर १० चित्रें आणि रंगांत छापलेलीं ६० वर कलापूर्ण रेखाचित्रें !



प्रकाशक : दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रीज — मुंबई ४.


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

